


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)






महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








# दीपावली

रजत महोत्सवी वर्ष

**कथा विशेषांक**

जुलै १९६९

मूल्य २ रु.

अनुक्रमणिका

कथा विशेषांक




# दीपावली

रसिक महाराष्ट्राचा साहित्य-कला-विलास

---

जुलै १९६९ * मूल्य २ रु.

## श्रेयनामावली

जीवनभर तो फुलतच होता  आचार्य अत्रे याना 'दीपावली'ची श्रद्धांजलि– **आदित्य** ● चेटूक. .गूढगुजनात्मक कथा–**सौ. विजया राजाध्यक्ष** धूसर रेषा. मनोविश्लेषणात्मक कथा–**मधुकर** ● शब्द. .कौटुंबिक शोकांतिका–**ग. का. भडकमकर** ● असो ! एक गर्भपात. उपरोधात्मक लेख–**श्रीराम कामत** ● एक युवती: एक चषक. .हृदयविदारक कथा–**प्रा. म. ल. वराडपांडे** ● संकट सुन्दरीला मदत. .विनोदी कथा–**पंडित क्षीरसागर** ● कान्ता वरयते वित्तम्. लोभी प्रणयिनीची कथा–**डॉ. शामसुंदर रघुवंशी, डी. लिट्.** ● पंचांगुळच्या. .चित्तथरारक कादंबरिका–**नारायण धारप** ● कथा ही चंद्रप्रवासाची. विज्ञान कथा–**प्रा. रा. वि. सोवनी** ● डेअर डेव्हिल जेंकिन्स. .सर्कस सात्यकथा–**शि. शं. कार्लेकर**

**कविता** वामन इंगळे, विंदा दीक्षित, कु. शकुंतला रोकडे, शिवाय इंद्रधनुष्य, सन्मानपुष्पे, दीपमाला, ऐसी अक्षरे रसिके, इत्यादी नेहमीची सदरे आणि

## ❋ राजकारणात पावसाळा आधीच सुरू झाला ❋

**मासिक विंगचित्रमाला**

नं.- ३५७७६५
: DALALART

**दलाल आर्ट स्टूडिओ. ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४**

संपादक–मुद्रक–प्रकाशक–मालक : श्री. **दीनानाथ दलाल,** दलाल आर्ट स्टुडिओ, ४२, केनेडी ब्रिज, मुंबई ४, यांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१, खेतवाडी मेनरोड, मुंबई नं. ४ येथे छापले. या प्रतीस किंमत २ रु.+रजि. पोस्ट ८० पैसे. वार्षिक वर्गणी : दिवाळी अंकासह रु. १५. अंकात प्रसिद्ध झालेली मते ही चालकांचीही अधिकृत मते असतातच असे नाही. चित्रे व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन. Registered with the Registrar of Newspapers for India under RN No. 1612/57 DIPAVALI : Dalal Art Studio 42, Kennedy Bridge, Bombay-4.









**दलाल आर्ट स्टुडिओ**

४२, केनेडी ब्रीज, मुंबई–४

टेलिफोन : ★ तारेचा पत्ता

३५७७६५ DALALART

● **वर्गणीदारांस सूचना** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १५ द्वैवार्षिक वर्गणी रु. २५; त्रैवार्षिक वर्गणी रु. ३० **परदेशी वार्षिक वर्गणी** रु. २०

● **वर्गणी** मनिऑर्डरने द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नावे, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास १.५० पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याही महिन्यापासून वर्गणीदार होता येते.

● **अंक न पोचल्यास** कळवावयाचे झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावे. अंक ऑफिसमध्ये शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यात येते. तरीही तांत्रिक अडचणीमुळे अगर अन्य कारणामुळे जाहिरातीत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरात सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेले नापसंत साहित्य परत पाठविले जाते. पुरेसे पोस्टेज नसल्यास ते निकालात काढले जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झाले तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक : श्री. **दीनानाथ दलाल** यांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१,खेतवाडी मेनरोड, मुंबई नं. ४ येथे छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२, केनेडी ब्रिज, मुंबई ४ येथे प्रसिद्ध केले.

# कथेची कथाः

माणूस जन्माला येण्यापूर्वीच त्याच्या मातेच्या उदरातून जन्म घेते त्याचे प्राक्तन ! मग येतो माणूस. एक मासाचा गोळा. त्या गोळ्याला मग कुणी तरी नाव ठेवतं. त्या नावाने सुरू होते ती त्या प्राक्तनाची कथा. प्रत्येक प्राक्तनाचे नाव निराळे. कथा निराळी. रूप निराळे. रंग निराळा. गंध निराळा. त्यातले निर्गुण सगुणाच्या रूपाने सतत काहीतरी बोलत राहते. सांगत राहते. करीत राहते. पहात राहते. गात राहते. त्या करण्या–बोलण्याला, गाण्याला अन् खाण्याला मग लोक म्हणतात जीवन ! अशा प्रत्येक जीवनाची म्हणजेच प्राक्तनाची कथा वेगळी असते. एकाच मातेच्या उदरातून येणाऱ्या दोन मुलांच्या प्राक्तनाची कथा वेगळी असते. ह्या असंख्य कथांनी जीवनाचे हे महाभारत लिहिले गेले आहे. लिहिले जात आहे. लिहिले जाणार आहे. जीवन संपणार नाही. कथा संपणार नाहीत. महाभारताची नवी नवी पाने भरणारच आहेत. ती भरण्याचे कामही नियतीने काही माणसांकडे सोपवून दिलेले दिसते आहे. त्या काही भाग्यवानांनाच म्हणतात कलाकार-कथाकार ! कुणी त्या जीवनांना रेखांकित करतो. तर कुणी ह्या मातीला दुसऱ्या 'माती' चा आकार देऊन सजीव करतो. कुणी त्या साऱ्या प्राक्तनांच्या कथांना शब्दरूप देतो आणि त्या साऱ्या कथा वाचून माणसे 'बहुत' होतात. प्रत्येक माणसाच्या आयुष्याला, त्याच्या बुद्धीला, कर्तृत्वाला, अनुभव घेण्याच्या व देण्याच्या शक्तीला काही अंगभूत मर्यादा असतात. शिवाय 'प्राक्तन' नावाची एक 'तलवार' त्याच्या शिरावर सतत टांगती असतेच. ह्या साऱ्यातून आट्यापाट्यांचा खेळ खेळत, 'मार' चुकवीत चुकवीत माणूस पुढच्या पाटीत जाण्याचा प्रयत्न करीत असतो. ह्या साऱ्या खेळाची कथा म्हणजेच माणसांच्या प्राक्तनांच्या कथा. माणूस अपूर्ण असतो. उणा असतो. त्याच्या ह्या प्रवासात त्याला 'तू एकटा नाहीस' हे सांगण्याचे काम कला-कथा करीत असतात. कथांच्या रूपाने 'विश्वरूप दर्शन' घडते आणि तो 'मामेकं शरणं व्रज' ह्या न्यायाने 'कृष्णार्पण' म्हणत प्रवास करीत राहतो. त्या प्रवासात त्याला कथा साथ करतात. अनेक 'कृष्णलीला व कृष्ण-कथा' त्याला कळतात. सृष्टीतली विविध रूपे त्याला घरी बसून दिसतात. अनेक माणसे त्याला आपण होऊन भेटतात. आपल्या कथा त्याला सांगतात. त्यात व्यथाही असतात आणि प्रेरणाही असतात. अंधारही असतो आणि प्रकाशही. छाया असते आणि काहिलीही असते. पण माणसाला हे द्वंद्वात्मक अनुभव सुख देऊन जातात–कारण सृष्टीची रचनाच मुळी द्वंद्वात्मक असते. काहिलीशिवाय छायेचे महत्त्व कसे कळणार ? खलत्वाच्याच पार्श्वभूमीवर साधुत्वाचे तेजोवलय उठून दिसते. हे सारे अनुभव त्याला घर बसल्या देण्याचे सामर्थ्य ह्या कथेच्या महाभारतात असते. म्हणूनच 'महाभारत'कार व्यासांनी सारे जग उष्टे करून टाकले असले तरी 'कथा' संपल्या नाहीत. अनुभव सरले नाहीत. मनातले रंगतरंग विविध रूपे दाखवीतच आहेत. ह्या असंख्य मनातला 'पारा' पकडण्याचा प्रयत्न म्हणजे कथाकारांची कथा ! पारा कायम आहे. पकडण्याची धडपड कायम आहे म्हणून 'कथा' कधी संपणार नाही. मनामनातला हा पारा कथेच्या बाटलीतून माणसे घरोघरी नेतात आणि म्हणूनच अनुभव-सुवर्ण त्यांच्या दारी जाते. (पाऱ्यातून सोन्याचा प्रयोग नुकताच यशस्वी झाला) ह्या अनुभव-सुवर्णाने माणूस 'श्रीमंत' होतो. 'धीमंत' होतो. आणि मुख्य म्हणजे 'बहुत' होतो. हे मोठेपण त्याला देण्याचे प्राक्तन ज्यांच्या 'लेखी' आले असते त्यांना म्हणतात कथाकार ! जीवनातल्या विविध अनुभवांना कलेचा सुवर्णस्पर्श देणारा कलाकार. जीवनाचा भाष्यकार ! !

'दीपावली'चा हा कथा विशेषांक हाती देताना आमची ही भूमिका आहे. कथेकडे आम्ही ह्या श्रद्धेने पाहतो. ह्या कथा वाचून आमचे वाचकही 'बहुत' होतील (संख्येनेही) असा विश्वास वाटतो.

—संपादक



# जन्मभर तो फुलतच होता !

आचार्य प्रल्हाद केशव अत्रे हे आधुनिक महाराष्ट्रातले एक 'श्रीमंत' गृहस्थ होते. म्हणजेच ते 'जीवन श्रीमंत' होते. 'अत्रे' हे नुसते देहानेच 'प्रचंड' नव्हते, ते कर्तृत्वानेही प्रचंड होते. प्रत्येक माणसाला मर्यादा असतात आणि त्या मर्यादेत जास्तीत जास्त मोठे होण्याचा तो प्रयत्न करीत असतो. आचार्य अत्रे हे 'अमर्याद' अफाट, अचाट गृहस्थ होते. ते प्रचंड 'वादळ' होते. ती 'वीज' होती. ते 'चैतन्य' होते. तो 'पारा' होता. तो एक 'महासागर' होता. आणि ह्या साऱ्याच्या तळाशी तो एक 'माणूस' होता. मानवी उणीवांनी मुक्त ! आणि तरीही त्या उणीवांवर मात करणारा मुक्तही ! आचार्य अत्रे यांचे जीवन अनेक अर्थानी चमत्कारासारखे होते. मात्र त्या साऱ्या व्यक्तित्वाच्या तळाशी पुन्हा जीवनावर, सौंदर्यावर, माणसावर, माणुसकीवर आणि जीवनातल्या मंगलतेवर व साधुत्वावर प्रेम करणारा माणूसच दिसत होता. त्या माणसाला वेड मात्र सतत सूर्यबिंबाचे होते. महत्तमाचे होते. आणि त्या दृष्टीनेच तो आयुष्यभर झेपावत राहिला. हे महत्तम त्यांनी टिळक, आगरकर, गडकरी-कोल्हटकर, शिवरामपंत-सावरकर, गांधी-नेहरू ह्या अनेक जणांनी पाहिलं आणि त्या दीपस्तंभांचा वेध घेत पण 'जीवनाचा' धागा अखेरपर्यंत पकडून ठेवून अत्रे झेपावत राहिले. पण नुसती जीवनावर श्रद्धा वा प्रीति असली म्हणजे काही इतके बहुरंगी, बहुढंगी व्यक्तित्व घडविता येत नाही. जीवनावर प्रेम करणारी माणसे तशी पुष्कळ असतात. पण अत्रे हे प्रतिभावंत होते. आणि नुसतेच प्रतिभावंतही नव्हते तर 'प्रयत्नवादी' होते. 'कष्टशील' होते. उद्योगशील होते. आणि आयुष्ये बदलण्याची किमया अशा प्रयत्नशील व उद्योगशील माणसानाच साधते. आचार्यांनी जिथे जिथे पाऊल टाकले ती ती गोष्ट कधी सामान्य वा 'चीप' मानली नाही. हव्यास नेहमी नव्वद-पंचाण्णव टक्के गुणांचा धरला. जीवनावर व अंगिकृत कार्यावर नितांत निष्ठा असल्याने कष्ट हे कष्ट वाटले नाहीत. तो एक योग वाटला. ती साधना मानली गेली. तप घडले. शिक्षणाच्या क्षेत्रात काम करतांना 'पोथीनिष्ठ' पद्धत फेकून दिली. 'नवयुग' वाचनमाला संपादित करून नवा दृष्टिकोन दिला. रंगभूमीच्या पडत्या काळात नवी नाटके, नवे विषय व नवे चेहरे देऊन क्रांति केली. चित्रपटाच्या क्षेत्रातील कार्य तर आजही अतुलनीय असे आहे. प्रेमवीर, धर्मवीर, ब्रह्मचारी, ब्रँडीची बाटली, पायाची दासी, वसंतसेना, श्यामची आई, फुले ह्या नावातच वेगळेपण जाणवेल. विशेषतः प्रेमवीर, धर्मवीर, ब्रह्मचारी, असे चित्रपट आता निघत नाहीत ही खंत मराठी मनात आहे.

राजकारणात ते पडले हे अपघातानेच ! अत्र्यांमध्ये एक गोष्ट फार मोठी होती! सारे करून पाहण्याची, सारे भोगण्याची, येतील त्या अनुभवांना सामोरे जाण्याची व त्या त्या अनुभवांसाठी द्यावी लागणारी मानसिक, शारीरिक व आर्थिक किंमत मोजण्याचीही त्यांची तयारी असे. आचार्य अत्रे यांचे 'मी कसा झालो' वा 'कऱ्हेचे पाणी' वाचले तर एक गोष्ट ध्यानी येते की, ह्या माणसाने वैभवही पाहिले आणि वंचनाही पाहिली. गर्दीही पाहिली आणि गर्दीतले एकाकीपणही अनुभविले. संकटं पाहिली. हार पाहिले आणि हारही घेतली. सामान्य प्रकृतीचा (केवळ शारीरिक नव्हे) हा माणूस असता तर खचला, पिचला असता, त्याने आत्महत्या केली असती. पण हा माणूस 'पुरुषार्थी' होता. आणि म्हणून हे सारे आघात व विष पचवीत पचवीत हा माणूस फुलत राहिला, फुलवीतच राहिला. जीवन पहातच राहिला. कवीच्या दृष्टीने–कलाकाराच्या रसिकतेने–विडंबक प्रचारकाच्या चष्म्यातून आणि मानवी करुणेच्या भूमिकेने पहातच राहिला. त्यांना चित्रपट-नाट्य–आदि क्षेत्रात व नंतरच्या सर्व राजकीय कार्यात उपयोगी पडली. महाराष्ट्रावर अन्याय झाला व १०५ माणसे मारली गेली तेव्हा तर ह्या वणव्याने पेट घेतला व अवघा महाराष्ट्र पेटविला. त्या मागे 'राजकीय' प्रेरणेपेक्षा 'साहित्यिक' व 'मानवी' प्रेरणा अधिक होती असे वाटते. याचे कारण महाराष्ट्र,



अनुक्रमणिका

मराठ्यांचा इतिहास, महाराष्ट्राचा भूगोल, मराठीची संत परंपरा, संत साहित्य व महाराष्ट्राने देशाची केलेली सेवा ह्याबद्दल अत्र्यांच्या मनात अपार अभिमान होता. भक्ति होती. ह्या भक्तीतून तेव्हाही अंगार फुलला व कुणा देशमुख धोंगड्यांनी व मंत्री मोहित्यांनी न रुचेल, पटेल असे सांगायला सुरुवात केली तेव्हाही तोच अंगार फुलला. अत्र्यांचे सारेच असे उत्कट, प्रचंड व मनस्वी होते. अशी मनस्वी माणसे क्षणाक्षणांनी जगतात म्हणूनच ती कुठल्याही पक्षीय चौकटीत (वा शिस्तीत ) बसूच शकत नाहीत. ती 'मुक्त' असतात आणि त्यांचे मुक्त राहणेच पुष्कळदा अशा बंदिस्त माणसांपेक्षा अधिक घणाघाती व सामर्थ्यशाली असते. अत्रे अशा अनेक उत्कट क्षणांनी जगले. धुंदीत जगले. ती धुंदी होती म्हणूनच ते समर्थही होते. आणि सर्वात असून मुक्तही होते. त्यामुळेच त्यांची प्रशंसाही 'प्रचंड' असे (म्हणून ती खोटी नसे ) आणि त्यांचा प्रक्षोभही 'प्रचंड' असे. 'सामान्य' असे त्यांना काही रुचत-पचत नसे. प्रचंड धाडस करणारी माणसेच जीवनाला काहीतरी प्रचंड देऊन जातात. अत्रे यांची सतत काही प्रचंड करण्याची हौस ह्या सारस्वताला प्रचंड काही तरी देऊन गेली आहे. त्यात स्वतःचे असे वेगळेपण निर्माण करण्याचा 'कष्टसिद्ध' प्रयत्न त्यांनी केला आहे. एक उदाहरण देण्याचा मोह होतो आहे. पानशेतचे धरण फुटले आणि नंतर पुण्यात हाहाःकार उडाला. तो इतिहास आजही थरकाप उडवितो. त्यावेळी मातीच्या धरणांसंबंधी मुंबईत पुस्तकालयात असलेली सारी पुस्तके त्यांनी विकत घेतली व मराठात माहितीपूर्ण लेखन केले. ते लेख लिहिण्याचा साक्षेप अत्रेच दाखवू शकले. अत्र्यांचं हाती घेतलेल्या प्रत्येक कार्यावर निरतिशय व निरपवाद प्रेम होतं. आणि मनस्वी माणसे अशीच असतात. असंच जगतात. 'मराठा'ला त्यांनी "सामान्यांचं" "असामान्य माध्यम" हे स्वरूप दिलं तेही ह्या भावनेतून ! अन्यथा 'मराठा' हे 'वृत्तपत्र' (न्यजपेपर ) नसून "विचार पत्र" (व्हयूज पेपर ) आहे हा ठसा जनमानसावर उमटता ना ! ही उत्कटता, मनस्विता त्यांच्या नेहमीच्या वागण्या-बोलण्यातही दिसत असे. औरंगाबादला संमेलनाला गेले असताना तेथल्या 'कुक'चे पाक-लाघव पाहून ते त्याला मुंबईला घेऊन आले. आणि मग बऱ्याच जणांना त्या लाघवाचे 'कौतुक' प्रत्यक्षच अनुभवायला मिळाले. जे जे उत्तम, उदात्त, सुंदर, मधुर, रुचिर असेल त्याचे त्याचे वेड त्यांना होते. कारण ते रसिक होते. जीवनातल्या प्रत्येक गोष्टीबद्दल त्यांच्या मनात उदंड उत्साह होता. कुतुहल होते. आणि अधम, असुंदर, ओंगळ त्याबद्दल घृणाही होती. अभ्यास चालूच असे. चालूच होता. समर्थांवर नाटक लिहायचे होते. तुकारामावर नाटक लिहायचे होते. 'मराठा' इंग्रजीतही सुरू करायचा होता. कितीतरी स्वप्ने–सत्तरीतही पुस्तकात संदर्भ अधोरेखित करण्याचा त्यांचा उत्साह, त्यांची प्रबल जीवननिष्ठा व जीवनेच्छाच सुचवून जातो. आणि हा अभ्यास करीत असतानाही ते 'अभ्यासजड' वा 'समाजविन्मुख' कधी झाले नाहीत. 'अवघड लिहिणे सोपे आहे पण सोपे लिहिणे मात्र अवघड आहे' असं ते नेहमी म्हणत. 'विनोदाला कारुण्याचं व मानवी सहानुभावाचं अस्तर असावं लागतं' अशीही त्यांची श्रद्धा होती. आणि म्हणूनच त्यांच्या 'झेंडूची फुलें'-चे ताजेपण (व सुवास–होय ! सुवासही ) अजून कायम आहे. त्यांच्यातला कवि, पत्रकार हा प्रधान होता म्हणूनच त्यांच्या 'अत्रे उवाच'ची व मराठातील अग्रलेखांची 'सूर्यास्त' व 'किती लहान, किती महान'-सारख्या पुस्तकांची पारायणे विचारधन व वाङ्मयधन म्हणूनही होत आहेत. होत राहतील. अत्रे यांचे मृत्युलेख, त्यांची प्रवास वर्णने त्यांनी लिहिलेल्या व्यक्तिरेखा (त्यातल्या शिव्या ओव्यांसहित ) आणि त्यांची ग्रांथिक परीक्षणे, त्यांचे नाट्य, चित्रपट, कथा, कादंबऱ्यादि साहित्य हे इतके विपुल आहे की महाराष्ट्रात, भारतात वा जगात त्याला तोड नाही. साहित्य निर्मितीबाबत अत्र्यांनी जागतिक रेकॉर्ड निर्माण केले आहे ही गोष्ट आम्हा मराठी भाषिकांना तर निःसंशय अभिमानाची आहे.

आचार्य अत्रे हे दैवी प्रतिभेचे लेणे लेवून आलेले गृहस्थ होते, हे खरे असले तरी तेही अखेर माणूसच होते. माणूस पूर्ण नसतो. अनेक गुणदोष त्यात असतात. काही अंगभूत असतात, तर काही परिस्थितिवातावरणजन्यही असू शकतात. आचार्य अत्रे यांच्या गुणांइतकेच त्यांचे काही दोषही तसे खुपण्याइतपत मोठे होते. पण त्यासकट ह्या माणसावर महाराष्ट्राने प्रेम केले. बालगंधर्वांचे उदाहरण ह्या संदर्भात आठवते. त्या कलावंताजवळ काही सीमेचे गुण होते आणि काही दोषही ! पण मराठी माणूस मनाचा कंजूष नसल्याने कलावंत गंधर्वांना व कलावंत अत्र्यांनाही त्याने त्यांच्या गुणदोषासकट सतत डोक्यावर घेतले. अत्र्यांना माणसांचे वेड होते. गर्दीचे वेड होते, प्रचंड गर्दीचे वेड होते. त्यांच्यातला शिक्षक, विडंबक, सुधारक व घणाघाती पत्रकार सतत सजीव होता. शरीर तसे वारंवार थकत होते. पण हा उद्योगशील कलावंत कधी थकला नाही. अनेक तरुण, म्हातारे, कांक्षाशून्य, ध्येयशून्य, कर्तृत्वशून्य माणसांचे दर्शन घडते तेव्हा असे वाटते की, अत्र्यांच्या पिढीला लाभलेला टिळक–आगरकर–सावरकर–आदि माणसांचा विद्युत् स्पर्शच त्यांना आजवर पुरला असला पाहिजे. अत्रे यांच्या व्यक्तित्वातच 'झुंज' होती. आंतर्बाह्य संघर्ष होता. आणि ह्या आंतरबाह्य संघर्षावर मात करील असे व्यक्तित्व घडविण्याइतपत समर्थ मन व समर्थ प्रतिभा परमेश्वराने अत्र्यांना दिली होती. आणि त्या समर्थ मनाचा व प्रतिभेचा साक्षेपी उपयोग सातत्याने व वारकऱ्याच्या श्रद्धेने करीत राहिल्यानेच ह्या माणसाला अनेक प्रकारचे अपयश व पराभव पचवूनही अंती 'लौकिक' यशही मिळाले. अत्र्यांनी कीर्तन, प्रवचन व रंगमंचावरील भूमिका ह्याही गोष्टी करून पाहिल्या. त्यांच्यातल्या 'जांगल्या' त्यांच्यातला 'गोंधळी' आणि

त्यांच्यातला 'माणूस' शेवटपर्यंत कायम होता.

सावरकर–हेडगेवार यांना अत्र्यांनी झोडपले. शेवटी सावरकरांना ते मानू लागले होते. १९६२ सालच्या निवडणुकीत ते जिंकले, समिती जिंकली. विधानसभेच्या बैठकीसाठी निघताना ते सावरकरांचा आशिर्वाद मागायला गेले. सावरकरांनी त्यांना हार घातला. तो हार त्यांनी अभिमान विषय म्हणून विधानसभेवर जाईपर्यंत गळ्यात वाळगला होता ही गोष्ट मी स्वतः पाहिली आहे. समर्थ-शिवाजी, तुकाराम, विनोबा, साने गुरुजी–ही त्यांची श्रद्धाकेंद्रे होती. समर्थांवरली त्यांची व्याख्याने, त्यांचे अलिकडील लेख त्यांच्या सत्तरीतल्या साक्षेपी वाचनाची साक्ष देत. 'मूर्तिभंजन' तर अत्र्यांनीही एके काळी केले व आजही करीत असत. पण ह्या मूर्तिभंजनात काही 'रीत' होती. चांगल्या पूजनीय मूर्ति फुटताना दिसल्या की अत्रे अस्वस्थ होत. त्यातून त्यांचे काही नव-साहित्यविषयक, शिव–समर्थ संबंधविषयक लेखन झाले आहे. सारीच मते पटतील असे नाहीत. पण 'अत्रे काय म्हणतात ?' ह्या गोष्टीला महत्त्व होते, महत्त्व राहील !

पानशेतच्या धरणफुटीपासून ते एखाद्या स्थानिक अन्यायापर्यंत आणि चित्रे–खानोलकरांपासून ते प्रा. देशमुख–धोंगडे यांच्या पर्यंत, 'आषाढस्य प्रथम दिवसे'-पासून ते 'सूर्यास्त'पर्यंत 'पुस्तक परीक्षणां-पासून ते एखाद्या असामान्य 'व्यक्तिरेखे'-पर्यंत चौफेर लेखन करणारी झरणी मोडली. 'हंशे' संपले. 'टाळ्या' विरल्या. ते प्रचंड व्यक्तित्व आपल्यासमोर पंचत्वात विलीन झाले. असंख्य माणसे होती. पहात होती. पण काही करू शकत नव्हती. काही करता येत नाही हीच तर नियति ! राख झाली. आता राखही उडून गेली असेल. पण काही चमत्काराने त्या राखेच्या कणांना जर कोंभ फुटले, त्यांना गति आली, वाचा फुटली तर ते कण काय म्हणतील आहे ठाऊक ? "असा माणूस गेल्या दहा हजार वर्षात सबंध जगात झाला नाही !" त्या कणाकणातून तुम्हाला दर्शन घडेल ते त्या महाकाया, बहुगुणी, संपन्न, कलंदर कलावंताचे ! तुमच्या तोंडून सहजच उद्गार निघतील "हे कलाकार, आम्ही तुला क्षमा केली आहे. का की तुझ्यावर रागावणे आम्हाला कधी जमलेच नाही."

"ईश्वर मृतात्म्यास शांति देवो" असे उपचार म्हणून म्हणायचे पण आचार्य अत्र्यांच्या मनस्वी व स्वप्नाळू वृत्तीला शांति माहीत नव्हती. परवडणारी नव्हती. राजमाचीवरील खोलीतून क्वचित आवाज येईल 'जयजय रघुवीर समर्थ' आणि 'शिवसमर्थ' नाटकाच्या वह्या शोधीत हा आत्मा भटकत राहील. "संपूर्ण महाराष्ट्र झाला का हो ?" म्हणून तो तमाम मराठी मनांना विचारीत राहील. "पांडुरंगाचे विमान माझ्या तुक्याला न्यायला आले का ?" म्हणून चौकशी करीत राहील. अत्रे अनेक अर्थांनी 'मुक्त' होते. पण 'तृप्त' नव्हते.

—"आदित्य"

## 'ओळखा पाहू'चे उत्तर

**'दीपावली'च्या वायुसेनादल विशेषांकाच्या (मे ६९) पान २३ वर छापलेले विमानाचे चित्र हे 'एच. एफ. २४' या विमानाचे आहे.**

**सदर विमान कोणत्या जातीचे आहे हे कळविणारी अनेक पत्रे 'दीपावली'कडे आली. पण फारच थोड्या वाचकांना बरोबर उत्तर देता आले. त्यातील बरोबर उत्तर देणाऱ्या यशस्वी वाचकांची नांवे खाली दिली आहेत. उत्तर बरोबर देणाऱ्या वाचकांचे मनःपूर्वक अभिनंदन !**

### यशस्वी वाचकांची नावे

१ सतीश भांडेः. .मुम्बई–१०
२ नीला ज. पाटीलः. चुनाभट्टीः कुर्ला
३ शैला दत्ता घरतः. .नायगांव, दादर
४ नितिन मा. देशमुख
५ निशात मा. देशमुख } चेंबूर, मुंबई
६ अजित प्र. देशमुख
७ पुनम ज. दुर्वे
८ केतन ज. दुर्वे } डोंबिवली (जि. ठाणे)
९ राजीव रा. वडखळकर
१० सुहास कुळकर्णी. .अंबरनाथ (जि. ठाणे)
११ उदय मा. काळेः. . .ठाणे
१२ हृदयनाथ आप्पा चंदन,. . .ठाणे
१३ सुधाकर शेंडः. . .गिरगांव, मुंबई
१४ शोभा रामचंद्र साठे,. . .पुणे–२
१५ यतींद्र ज. मराठे. .ताराबाग, मुंबई–४
१६ श्रीकान्त त्रैलोक्यः. .मालाड
१७ चंद्रकान्त पाटीलः. . .शहापूर (जि. ठाणे)
१८ सुधा बर्वेः. . .ठाणे
१९ मधुकर देसाईः. .गोरेगांव, मुंबई
२० लता करंदीकरः. .डहाणू रोड
२१ अशोक मोडकः. .नागपूर
२२ राजेंद्र करंदीकरः. .नवी दिल्ली
२३ शंकर गायकवाडः. . . .बडोदे
२४ प्रेमलता देवस्थळीः. . .सातारा
२५ विजया वैद्यः. . .चिपळूण
२६ रवींद्र राईलकरः. . . .कोल्हापूर
२७ बीना राऊतः. . .ठाणे
२८ जगन्नाथ जगदाळेः. . .अमरावती
२९ मंगल परांजपेः. . .यवतमाळ
३० शिरीष खरेः. . . .हैद्राबाद
३१ कु. पद्मा कोतवालः. . . .मुलुंड (पूर्व)


अनुक्रमणिका






सौ. विजया राजाध्यक्ष

काल रात्रीपासून कृष्णरावांना या अंधारकोठडीत डांबण्यात आले होते. त्यांना येथे कोणी आणले, कसे आणले याविषयी त्यांना काहीच आठवत नव्हते. त्यांनी आठवण्याचा पुष्कळ प्रयत्न करून पाहिला; पण व्यर्थ ! कोणी आपली चौकशी करण्यासाठी आल्यास त्याला यासंबंधी विचारू असे त्यांनी ठरवले होते. पण ते येथे आल्यापासून एखादे चिटपाखरूसुद्धा या बाजूला फिरकले नव्हते. त्यामुळे कृष्णराव अगदी त्रासून गेले होते. काल रात्रीपासून त्यांना झोप नव्हती. आज सकाळी उठल्यावर त्यांना चहा मिळाला नव्हता, वर्तमानपत्र वाचायला मिळाले नव्हते. त्यामुळे ते अधिकच खिन्न झाले होते; अस्वस्थपणे इकडून तिकडे येरझारा घालीत होते. घरीही ते शतपावली घालत. पण त्यावेळी त्यांच्या मनात कित्येक विचार असत. आज तसेही काही नसल्यामुळे त्यांनी त्रासून जावे हे स्वाभाविकच होय. प्रत्येक मनुष्यप्राण्याची एक ठराविक दिनचर्या असते; तिच्यात खंड पडल्यावर त्याला चुकल्यासारखे, त्रासल्यासारखे वाटणे हे मनुष्यस्वभावाला व सृष्टिनियमाला धरूनच आहे. एकटे कृष्णराव याला अपवाद कसे असणार ?

येरझारा घालूनही प्रक्षुब्ध मन शांत होईना म्हणून कृष्णरावांनी त्या अंधारकोठडीचे निरीक्षण करण्यास सुरुवात केली. प्रथम त्यांना काही दिसेचना; कारण तेथे फारच अंधार भरलेला होता तो अंधार काळाकुट्ट असून फारच भयाण होता. कृष्णराव हे धाडसी स्वभावाचे असूनही त्यांना त्या अंधाराचे भय वाटले; यावरून तो अंधार किती भेसूर होता, याची कल्पना येईल. परंतु प्रथम भीतीदायक वाटणाऱ्या वस्तूंचा हळूहळू सराव होणे हाही मनुष्य स्वभावच असल्यामुळे कृष्णरावांस त्या अंधारातही दिसू लागले, यात नवल ते काय ? त्या कोठडीच्या भिंती अत्यंत उंच होत्या. त्यामुळे अगदी वरपर्यंत नजर पोचणे अशक्यच होते. अगदी वरच्या भागावर काही अक्षरे लिहून ठेवली आहेत असे कृष्णरावांना आढळले. पण ती काय आहेत याचा बोध होण्याजोगा

नसल्यामुळे त्या फंदात न पडता कृष्णरावांनी आपली नजर दुसरीकडे वळविली. कोठडीच्या वरच्या भागात एक लहानसा झरोका होता. त्यातून थोडी फार हवा आत येत होती. आश्चर्य म्हणजे कोठडीला एकही दार किंवा खिडकी नव्हती. कोठडीत जागोजाग कोळिष्टके लागलेली होती; एक प्रकारचा कुबट वासही चोहीकडे दरवळला होता. काही आकृतीही येथे गूढ, अदृश्य स्वरूपात वावरत असाव्यात असा कृष्णरावास संशय आला. त्यांनी चौकसपणे चहूबाजूला आपली नजर फिरवली; पण अंधारामुळे त्यांना स्पष्टपणे काहीच दिसू शकले नाही. या अंधारात आपल्याला किती काळ कंठावा लागणार ? सुटकेचा तर काहीच मार्ग दिसत नाही. घरची मंडळी चिंतातुर झाली असतील; आपण एकाएकी नाहीसे झाल्यामुळे घरात हलकल्लोळ उडाला असेल. आपले स्नेही सर्वत्र शोधाशोध करत असतील. पण त्यांना या अंधारकोठडीची वार्ता लागणे अशक्यच होय. आपले कसे बरे होणार ? इत्यादि विचारांनी कृष्णरावांस फारच दुःख झाले. ते दुःखित अंतःकरणाने एका कोपऱ्यात कपाळाला हात लावून बसून राहिले. यानंतर कित्येक क्षण निघून गेले. काळ निष्ठुरपणे पुढे सरकत होता. बिचारे कृष्णराव तसेच बसून होते. इतक्यात त्यांना एक आकृती आपल्यासमोर उभी असल्याचा भास झाला. तो भासच असणार, या अंधारकोठडीत दुसरे–तिसरे कोणी येणे कसे शक्य आहे या विचाराने कृष्णरावांनी तिकडे दुर्लक्ष केले. इतक्यात त्या आकृतीचा शब्द कानी आला. त्यामुळे हा भास नसून खरोखरीच आपल्यासमोर कोणीतरी उभे आहे याबद्दल कृष्णरावांची खात्री होऊन चुकली.

"कोण आहे ?" त्यांनी दरडावून विचारले.

"मी. या अंधारकोठडीची स्वामिनी."

–हे उत्तर कानावर पडताच कृष्णरावांनी चमकून वर पाहिले. त्या अंधारातही ती आकृती त्यांना स्पष्टपणे दिसत होती. ती आकृती एका स्त्रीची होती. पण ती कोणी मानवी स्त्री नव्हती. तिचे रूप भेसूर होते; आवाजही घोगरा होता. तिच्या भोवती कसला तरी अद्‌भुत प्रकाश होता. यावरून ती एखादी चेटकी असावी असा कृष्णरावांनी तर्क केला. आपणही तिला यापुढे चेटकी असेच म्हणू.

"तू येथे कशी आलीस !" कृष्णरावांनी विचारले.

"हे मला विचारणारा तू कोण ? पण तू विचारलेसच म्हणून सांगते, मी बाहेरून आले नाही. मी काल रात्रीपासून अदृश्य स्वरूपात येथेच वावरत आहे."

"म्हणजे मला येथे आणणारी तूच ती चांडाळीण तर !"

कृष्णराव संतापून म्हणाले. यावर त्या चेटकीने विकट हास्य केले व ती म्हणाली, "होय. मीच ती. कशी काय वाटते ही अंधारकोठडी ? तुझा वेळ चांगला जातो आहे ना ?"

"अग चांडाळणी, मला असे एकांतवासात डांबून वर 'वेळ चांगला जातो ना ?' असे निर्लज्जपणे विचारतेस ? तुझ्या दुष्टपणाला काही सीमाच नाही !"

"हे मानवा, असा त्रागा करू नकोस. तुझे उत्तम मनोरंजन व्हावे म्हणून मी पहा या अंधारकोठडीत किती सोयी करून ठेवल्या आहेत !"

**ही पहा तू चोरलेली काही माणसे....ही खिळखिळी झालेली माणसे....ही मुखपृष्ठ गेलेली माणसे....ही मुखपृष्ठ घालून सजविलेली माणसे....यातली तुला नको असलेली माणसे एका पिशवीत भर नि चल माझ्याबरोबर रद्दीवाल्याकडे....**

कृष्णराव काकुळतीने म्हणाले, "का असा छळ करतेस ? मी तुझा कोणता अपराध केला आहे म्हणून तू मला असे प्रायश्चित्त द्यावेस ?"

यावर भेसूर हास्य करीत ती चेटकी म्हणाली,

"त्याविषयी आपण नंतर चर्चा करू. तूर्त या अंधारकोठडीत वेळ जाण्याची साधने तर पहा !"

"कोणती ?" कृष्णरावांनी हताशपणे विचारले.

"आता कसा वठणीवर आलास ! तुला क्रमशः सांगते. नीट लक्ष देऊन ऐक. या कोठडीला दारे खिडक्या नसल्याचे तुझ्या लक्षात आले असेलच. पण ज्याअर्थी तू येथे प्रवेश केलास त्याअर्थी हिला एखादे दार असले पाहिजे हे उघडच आहे. कोठे आहे बरे ते ?– शोधून काढ. त्यात तुझा पुष्कळ वेळ जाईल. तशीच ही कोळिष्टके पहा. गेले कित्येक दिवस ही आहेत. ती झाडून काढणे हेही तुझेच कर्तव्य नव्हे काय ? त्यातही तुझा पुष्कळ वेळ जाईल. आणि येथे आल्यापासून या भिंतींच्या अगदी वरच्या भागाकडे तू कधी नजर टाकली आहेस काय ? टाकली असलीस तर तेथे काही लिहून ठेवल्याचे तुझ्या लक्षात आले असेल. ते वाचण्यातही तुझा पुष्कळ वेळ जाईल. शिवाय येथे कुबट वास दरवळला आहे हे तुझे घ्राणेंद्रिय तीक्ष्ण असेल तर तू जाणले असशील. कसला वास आहे बरे तो ?– काही गोष्टी येथे मृतावस्थेत पडलेल्या असल्यामुळे ही दुर्गंधी येत आहे. या गोष्टी उचलून फेकून दे. तुला दार दिसले की खिडक्याही दिसतील. आता तू असे विचारशील की हे सगळे अंधारात राहून करणे कसे शक्य आहे ? येथे तुला इतकेच सांगते की या कोठडीत अशी एक कळ आहे की जी फिरवताच यथील अंधार निमिषार्धात नाहीसा होतो." इतके बोलून ती चेटकी अदृश्य झाली. हे तिचे रहस्यमय भाषण ऐकून कृष्णराव हतबुद्ध झाले. काही वेळाने त्या चेटकीच्या सांगण्याप्रमाणे त्यांनी इकडे तिकडे पाहावयास सुरवात केली. परंतु त्यांना एकही दार दिसले नाही. ते कोठडीभर फिरले, पण ती अंधार नाहीसा करणारी अद्‌भुत कळही त्यांना कोठे आढळली नाही. इतकेच की कोठडीत वावरत असताना आपल्या पायाखाली काही निर्जीव थंड वस्तू येत आहेत असा त्यांना भास होऊ लागला. चेटकीने सांगितलेल्या मृतावस्थेतील वस्तू त्या याच असाव्यात असा कृष्णरावांनी तर्क केला. पण यापैकी काहीच त्यांना स्पष्टपणे दिसले नाही. आपल्या भोवतीचा अंधार अधिकाधिक दाट होत चालला आहे असे त्यांना वाटले; आणि पुन्हा एकवार 'त्यातून सुटकेचा काहीच मार्ग दिसत नाही' या विचाराने ते खिन्न होऊन गेले. ते असे खिन्नपणे बसलेले असतानाच ती चेटकी पुन्हा एकवार त्यांच्यासमोर उभी राहिली.



अनुक्रमणिका

"हे मानवा, तू सुखात आहेस ना ? तुझा वेळ चांगला जात आहे ना ?" तिने प्रश्न केला.

कृष्णरावांनी ओळखले की आता त्रागा करण्यात अर्थ नाही. आपण हिच्या हातातील केवळ एक कळसूत्री बाहुले आहोत. तेव्हा हिच्या तंत्रानेच वागणे भाग आहे. असा निश्चय करून कृष्णराव म्हणाले "हे स्वामिनी, माझ्यावर दया कर. मला या एकांताचा फार कंटाळा आला आहे. आम्ही मर्त्य माणसे वेगवेगळ्या मार्गांनी कालक्रमणा करतो. त्यापैकी काही साधने तरी तू तुझ्या अंगच्या अद्भुत सामर्थ्याने मला उपलब्ध करून दे."

कृष्णरावांच्या या विनवणीने चेटकीच्या अंतःकरणाला थोडा पाझर फुटला असावा असे दिसले; कारण ती म्हणाली "तुला कोणती साधने हवी आहेत ?"

कृष्णराव उत्सुकतेने म्हणाले, "मला वृत्तपत्र हवे आहे."

"ते तुला कशासाठी हवे आहे ?"

"हा काय प्रश्न झाला ?—वेगवेगळ्या वृत्तांसाठी !"

"तर मग ती वृत्ते मी तुला सांगते : एक—रशिया व झेकोस्लोव्हाकिया यांच्यात तडजोड. दोन : गेला सबंध आठवडा पाऊस नाही. तीन आजचे तपमान

"मला ही वृत्ते नकोत."

"मग तुला कसली वृत्ते हवीत ?"

"आज रामरावांचा रक्तदाब किती आहे ? हरिपंतांच्या अंगाला काल सबंध दिवसात किती वेळा खाज सुटली ? रघुनाथरावांना काल त्यांच्या साहेबाने ताणले होते; त्यांचे पुढे काय झाले ? सुंदरराव आपल्या पत्नीला मारतात हे वृत्त खात्रीलायक आहे काय ? आमचा वातमीदार कळवतो की विनायकराव व त्यांचे चिरंजीव यांचे एकमेकांशी पटत नाही "

हे ऐकता ऐकता चेटकी विस्मयचकित झाली. ती म्हणाली "तुमच्या वृत्तपत्रात असली वृत्ते छापलेली असतात काय ?"

कृष्णराव म्हणाले, "छापलेली नसतात; ती आम्हाला न छापली जाताच कळत असतात. आमच्या जगात माणसे हीच वृत्तपत्रे असतात. तेव्हा हे चेटकी, त्या माणसांची व माझी भेट कृपा करून घडव. काल रात्रीपासून मला यासंबंधी काहीच न कळल्यामुळे मी अगदी अस्वस्थ होऊन गेलो आहे . . . ."

हे ऐकून त्या चेटकीची हसता हसता पुरेवाट झाली. महत्प्रयासाने आपले हास्य आवरत ती म्हणाली, "तू मोठा चतुर दिसतोस. वृत्ते कळण्यासाठी तुला माणसे हवी आहेत काय !—एकदा या कोठडीत माणसांचा प्रवेश झाल्यावर तुझ्या एकांतवासाला कसला अर्थ उरला ?—तुझ्या या धाडसी मागणीबद्दल तुला काहीतरी शिक्षा केलीच पाहिजे !" — असे म्हणत या चेटकीने आपल्या कंबरेला खोचलेल्या बटव्याला हात लावला. हे पाहून कृष्णराव भयचकित झाले. त्यांना वाटले, "ही आता यातून एखादा सुरा काढून आपला प्राण तर घेणार नाही ? किंवा यातून एखादी विषवल्ली काढून ती आपल्या सर्वांगाला फासून त्याचा दाह तर करणार नाही ?" ते धडधडत्या अंतःकरणाने त्या चेटकीकडे पाहू लागले.

तो काय आश्चर्य ! त्या बटव्यातून सुरा किंवा विषवल्ली न काढता त्या चेटकीने एक दैनंदिनी बाहेर काढली. आणि वाचकहो ही दैनंदिनी आपल्या कृष्णरावांचीच होती. ती पाहून कृष्णरावांच्या अंतःकरणाला प्रेमाचे भरते आले. "दे, दे ती दैनंदिनी इकडे" ते उतावीळपणे म्हणाले.

चेटकी म्हणाली, "थांब, असा अधीर होऊ नकोस. आज कोणती तारीख बरे ?"

"सत्तावीस ऑगस्ट."

"असे काय ?" म्हणून चेटकीने सत्तावीस ऑगस्टचे पान उघडले. ते सबंध पान, त्यावर काहीकाही लिहिल्यामुळे भरून गेले होते. ते पान कृष्णरावांपुढे धरत ती म्हणाली, "मला ही लिपी वाचता येत नाही. यातील एकेक वाक्य मला वाचून दाखव बरे !" 'या अंधारात आपल्याला वाचता कसे येणार ?' अशी कृष्णरावांच्या मनात शंका आली. ते ती शंका चेटकीला बोलून दाखवणार तोच एक चमत्कार झाला. भोवती अंधार असताही ती अक्षरे कृष्णरावांना स्वच्छ दिसू लागली. याला चेटकीच्या अंगातील गुप्त सामर्थ्य कारणीभूत असले पाहिजे हे कृष्णरावांनी ओळखले व चेटकीच्या आज्ञेनुसार ते एकेक वाक्य वाचू लागले :

"सकाळी सात : खानोलकर भेटण्यासाठी येणार."

हा कृष्णरावांचा जिवलग स्नेही होता. दिवसातून एकदा तरी ते परस्परांना न चुकता भेटत असत. त्यांचा वेळ आनंदात जाई. खानोलकर कृष्णरावांना निरनिराळ्या माणसांच्या कथा सांगून ते कसे विद्वान आहेत, मोठे आहेत, लोकप्रिय आहेत, हे परोपरीने पटवून देत असे. कृष्णरावांचे मन कधी कधी उदास असले की खानोलकरचा त्यांना फार उपयोग होत असे

कृष्णरावांनी दुसरे वाक्य वाचले : "सकाळी सव्वानऊ—देशपांड्यांना भेटावयास जाणे."

यांच्याविषयी कृष्णरावांना खरे म्हणजे प्रेम नव्हते. ते आपल्याशी अनेक बाबतीत एकसारखी स्पर्धा करत आहेत असे त्यांना

(पृष्ठ ६४ वर पहा)

**इंदुरात नुसता ढगांचा गडगडाट**



**पाऊस (शांतता) नाही !**

# “नाश्त्याबरोबर मी नेहमी तांबं खातो !”

शिवाय लोह, कॅल्शियम अन् आयोडिन खातो ते वेगळंच. खरं तर हे सदगृहस्थ ८ महत्त्वाची खनिज द्रव्ये अन् ११ अत्यावश्यक जीवनसत्त्वे घेत असतात. निरोगी जीवनाला अपरिहार्य असलेली ही सारी द्रव्ये व्हिमग्रॅनच्या अवघ्या एका टॅब्लेटमध्ये सामावलेली असतात. नुसतेच आरोग्य नाही तर उत्साह अन् प्रखर रोगप्रतिबंधक शक्ति यांसाठी आवश्यक असणारी सारी जीवनसत्त्वे व खनिज द्रव्ये व्हिमग्रॅनमध्ये आहेत. उदाहरणच द्यावयाचे झाले तर तांबं घ्या. ताज्या रक्ताची निर्मिती अन् कामासाठी लागणारा उत्साह आपल्याला या खनिजामुळे मिळतो. व्हिमग्रॅनमधील इतर जीवनसत्त्वे व खनिज द्रव्ये नियमित घेतल्याने या सदगृहस्थांची त्वचा अन् दृष्टी अतिशय निरोगी राहिली असून त्यांचे दात अन् हाडेही पूर्वी कधी नव्हती एवढी कणखर आहेत.

# व्हिमग्रॅन®

अनेकविध जीवनसत्त्वे
व खनिजे असलेल्या टॅब्लेटस






® हा रजिस्टर्ड ट्रेडमार्क ई.आर. स्क्विब अँड सन्स यांचा असून तो वापरण्याची अनुमती करमचंद प्रेमचंद प्रा. लि. यानी मिळविली आहे.

## व्हिमग्रॅनची अवघी एक टॅबलेट दिवसासाठी लागणारा सारा उत्साह मिळवून देते.

SQUIBB®
SARABHAI CHEMICALS

Shilpi SC 7/69 MAR










# धूसर रेषा

मधुकर



"हा वेडा पीर आहे तरी कोण ?"

"कोणचा ?"

"तो त्या शिलाखंडावर बसला आहे बघा, तो ?"

"हं : ! अहो हा हिप्पी ! सुवत्तेतून जन्मलेलं हे वेड !"

"तो नव्हे हो. हिप्पी का मला ओळखत नाही ?"

"मग ?"

"तो पलिकडच्या खडकावर बसलाय ना तो ? रोज येऊन बसतो इथं तीन तीन तास. मी पहातो ना !"

"रोज येता वाटतं इथं तुम्ही ?"

"होय. येतो रोज. ही मंदिरं पहायला तर आलोय् हजार मैलावरून."

"मुंबईचे का ?"

"नाही पुण्याचे."

"रोज याही माणसाला पाहता होय इथं ?"

"हो ना. हातात एक वही, एक पेन्सिल."

"चित्रकार असेल."

"पण स्केचेस करताना दिसत नाही."

"मग ?"

"एकटक बघत बसतो या अप्सरा नि हे गंधर्व. मधूनच हसतो. हातवारे करतो. तीन तीन तास दृष्टी मात्र समोर—या विश्वनाथ मंदिरावरच्या घुमटावरील त्या संभोगासनाकडे."

आता तिथं आणखी दोघे जमतात. एका माणसाने दुसऱ्याकडे बोटं दाख दाखवून केलेलं भाषण अनेकांच्या कुतुहलाचा विषय न झालं तरच नवल.

. तो मात्र त्या शिलाखंडावर तसाच बसून समोर बघत असतो. स्वतःत हरवलेला. डोळे डोह होतात. त्यात काळाच्या सावल्या पडतात. हिरवीगार कुरणे सभोवती असतात. सूर्य मावळतीला पार कललेला. फक्त धूसर संधिप्रकाश वस्तूंच्या अस्तित्वाची पुसट जाणीव देणारा पण वस्तू मात्र लपवणारा

तो फुक्कन् आपल्याशीच हसतो.

त्याच्याकडे मघापासून चवीनं बघणारा तो पुंजका त्याच्या त्या हसण्याकडे बघून सातमजली खिदळतो. "तो वेडा आहे नि आपण शहाणे आहोत" असं म्हणाल्याच्या आनंदात समाधान पावत.

एक आंग्ल जोडपं सावकाश येतं. शांतपणानं एका कोपऱ्यावर उभं राहातं. तो खांद्यावर लटकणारा कॅमेरा काढून फोकस साधतो. ती मूर्तीवर दृष्टी खिळवते. मूर्ती–एक बाकदार अंगयष्टीची अप्सरा तिचे जीवनानं मुसमुसणारे गोल गरगरीत पयोधर. तिच्या शरीराला सर्प विळखा घालून तिच्या उन्नत वक्षाची स्पर्श-पालवी खुडणारा तिचा प्रियकर . .

आंग्ल युवती एकटक पहात उभी.

तिच्या चेहऱ्यावर तिनं भोगलेलं रतिसुख स्पष्टपणे दिसतं म्हणजे त्यातला उन्माद, आसक्ती, स्वतःचं समर्पण

तिला दुसऱ्या कशाचंच भान नाही.

आणि धरित्रीच्या शयनमंदिरात आकाशाच्या घुमटाखाली एक तो नि एक ती यांचं ते अपरिहार्य एकत्व पहाताना ती स्वतःचं अस्तित्व विसरते, ओळख टाकते

तिच्या चेहऱ्यावर आसक्ती आहे पण ती कोणत्याही पुरुषा-बद्दल नाही. उन्माद आहे पण तो अपौरुषेय पुरुषावरोबरचा

. . . त्याचा फोटो काढून झाला. कॅमेरा बंद करून खांद्यावर टाकून तो हलकेच तिच्याशेजारी येऊन उभा राहातो. कुणीच एक-मेकाशी बोलत नाही. दोघे परस्परांना विसरतात. दगडी मूर्तीत परस्परांना विसर्जित करून आकाशाने धरणीशी रतावे तसे ते अबोध सुख घेतात.

'खजुराहो'चं विपुल उन्मादक शिल्प माणसाच्या जगाकडे दगडाच्या डोळ्यांनी पहात उभं असतं. मंदिराचे कळस नि गोपुरे प्रणयी युग्मांनी व्यापली आहेत. अनंत, अगणित मूर्ती, चित्रं, युगुले, स्त्री नि पुरुष यांच्या जोड्या

वस्त्रे आहेत, आहेत; नाहीत, नाहीत

कारण वस्त्र म्हणजे कापूस आला, शेती आली, सूत आलं, विणकाम आलं, विक्री आली, नफा आला, फसवणूक आली, पिळवणूक आली कोळसा, कोळसा, सगळा. राख, फोलपट, फापटपसारा असलंच सगळं काही आलं

मग वस्त्र नकोच. क्वचित् कुठं अंगावर असलं तरी ते अव्हेर-ण्यातच निर्भर आनंद साठवला असतो. रक्त सळसळत असताना वस्त्राची कोमट ऊब हवी कशाला ? इंद्रिये पुष्ट असताना रेशमाची तलम मलई किस झाड की पत्ती ! डोळे दोन नि दोन चार डोळे परस्परांच्या शरीरातील आगीची नशा पिऊन धुंद झालेत तिथं वस्त्रहीनतेची लज्जा वाटायला ते जाणीवेच्या सीमावर आहेतच कुठं ?

म्हणून विवस्त्र उभी शरीरं, निकोप आरोग्यसंपन्न इंद्रियांचा अनंदोत्सव, फक्त शरीरसुखाचा आनंदमोक्ष भोगणाऱ्या प्रकृती-पुरुष जोड्या त्यांची तऱ्हेतऱ्हेची आसनं, निर्भर आनंद-समाधीत मग्न झालेली ती जोडपी

'खजुराहो'चं शिल्प म्हणजे माणसांच्या जंगलातून वेचून घेतलेलं सर्वकाली, सर्वव्यापी, सर्वदेशी खरं असणारं निखळ माणूसपण

त्याला असंच काही वाटत असेल काय ? त्या शिलाखंडा-वर वसून एकाग्रपणे 'बघण्याचा' आनंदोत्सव साजरा करणारा तो वेडा मुसाफिर ? त्याला ?

---

**...त्या मदोन्मत्त पुरुषासमोर जी अप्सरा उभी होती ती मात्र समर्पणाचा अर्क काढून त्याचीच केली असावी इतकी आतुर, समर्पित नि धुंद दिसत होती...**

---

आंग्ल युवती नि युवक न बोलता पुढं निघून जातात. वेड्या-कडे पाहून खिदळणारं ते टोळकं आणखीनच चेकाळत गदारोळ घालतं. दगडी मूर्तीतली अनंगसमाधी माणसांच्या वस्त्रान्वित देहातल्या माकडचेष्टा पाहून लज्जित होते.

मग पंजाबी पोषाख केलेल्या तग तरुणींचा तांडा डावीकडून येतो. एकदम समोर पाहून गप्प होतो. मोठ्यानं हसले किंवा आश्चर्य दाखवले तर आपणच जगु नग्न झाल्यासारखे वाटेल वाटते म्हणून त्या, पाहून न पाहिल्यासारखे पहात, निश्चल उभ्या आहेत. इतक्यात त्यांची सगळ्यांचीच नजर एकदम समोरच्या एका शिल्पा-वर खिळते. तापमापकात पारा सळ्कन वर चढावा तशी लज्जा पोटातून एकदम चेहऱ्यावर पसरते आणि गोरे, गुबगुबीत मुखवटे लालगुलाबी होतात.

पण डोळे चिकटवल्यासारखे समोरच पहात राहातात. पाय भुईवर खिळल्यासारखे तसेच उभे असतात.

"तुम्ही आमच्यातून चला बघू" त्या तारुण्यानं मुसमुसणाऱ्या नवयौवना आपल्यातील तीन पुरुषांना सांगतात, "तुम्ही वेगळे बघा. आम्ही वेगळे बघतो."

पुरुष जातात. तरुण मुली एकट्याच राहतात. आता पुनः समोर पहातात.

पण पहातानाच त्या पुनः पुनः इकडे तिकडे पहातात आणि तहानलेल्यानं अधाशासारखं पाणी प्यावं तसं पुनः त्या शिल्पाकडं दृष्टी वळवतात

डोक्यावर मुकुट असलेला एक 'तो' उभा असतो. . दोन पावलावर जबर आत्मविश्वास रोवून . . चेहऱ्यावर आश्वासन डोळचात दरारा . . वाहूत मद आणि इंद्रिये उद्दीपित झालेली . . .

त्याच्याकडे पाहिल्यावर त्या वस्त्रविभूषित गौरांगनाना असं काय जबर आकर्षण वाटत होतं की त्यांचा पाय तिथून निघू नये ? इथेच वस्त्रे फेकून द्यावीत नि सर्वांगी त्याला जाऊन मिळावे अशी तर रक्तातील पेशींची उत्कट इच्छा नव्हती ?

त्यांची नसेल किंवा असेल. पण त्या मदोन्मत्त पुरुषासमोर जी अप्सरा उभी होती 'ती' मात्र समर्पणाचा अर्क काढून त्याचीच केली असावी इतकी आतुर, समर्पित नि धुंद दिसत होती. आणि तिचं त्याच्यापासूनचं अंतर अगदी संपुष्टात येत असतानाच, थोडचा दूरवर, चार सख्या एका नवोढेला गोड सक्तीनं त्याच्याकडे नेत होत्या. ती नको म्हणत होती पण स्वप्निल मीलनाचा अनोखा आनंद व तुष्टी तिच्या चेहऱ्यावर पूर्ण चंद्राच्या चंद्रिकेसारखी पसरली होती

आणि अजूनही त्या मुसमुसणाऱ्या देहातील पंजाबी नवयुवती स्वतःला विसरून स्त्री–पुरुषाचा तो मीलनोत्सव पहात तिथं उभ्या होत्या

शिलाखंडावर बसलेला तो एकदम खिशातून स्केचबुक काढतो आणि पेन्सिलीनं, समोर बघत उभ्या नि आडव्या रेषा कागदावर रेखाटतो.

नीट पाहिलं तर चक्क दिसतं की त्या नवयुवतीच्या चेहऱ्यावर दिसणरा आसक्तीचा गाढ भाव नि त्या 'वेडया'च्या चेहऱ्यावरील रेषा ओढताना दिसणारा भोगानंद यांची खोली सारखीच आहे.

तेवढचात समोरून हिप्पींचा एक तांडा येतो. ज्यात पौरुष शोधूनही सापडले नसते अशी कृश, पडवळासारखी व निस्तेज पुरुष माणसं नि तसल्याच कोरडचा विद्रूपकी थाटाच्या झुरळासारख्या दिसणाऱ्या एक दोन मुली. स्वतःजवळ दुसऱ्यांना देण्यासारखं काही नाही आणि घारीने झडप घालून आपल्यातला 'ऐवज' झपाटन घ्यावा अशी आव्हानात्मक मादकता आपल्यात नाही या जाणिवेने या कृश हिप्पी स्त्री-पुरुषांना समोरच्या दगडी शिल्पचित्रातले दोन्ही हातात न मावणारे स्तन आणि सबंध कवळात न घेरला जाणारा नितंब प्रदेश पाहून आणखीनच वेडचासारखं वाटतं.

आपलं शारीरिकः दारिद्र्य लपवण्यासाठी समोरच्या उत्तान संभोगासनाकडे पुनः पुनः चेकाळून पहात व त्याकडे बोटं दाखवीत ते एकमेकाशी खिदळून बोलतात. एक तरुण एका तरुणीला कवेत घेतो. खाटकाच्या हातातून सुटण्यासाठी कोंबडीनं केकाटावं तशी ती कलकलाट करते. तरीही आपलीच निवड त्यानं केली म्हणून तेवढचातल्या तेवढचात डोळचात ऐट आणून ती दुसऱ्या दोघींकडे पहाते. मग ती त्या तरुणाच्या लांब जटा दोन्ही हातांनी कुस्करते. तिचे पिवळसर दात चमकतात. त्यातले दोन सोन्याचे असतात. तो तरुण तिच्या नितंबावर चापटचा मारतो. पण नितंबाच्या जागी सारा सपाट प्रदेशच असतो. शरीराचा प्रत्यक अवयव वेगळा व सत्वयुक्त असावा लागतो याची जाणच या वाळलेल्या व पोचट हिप्पींना नाही. समोरच्या शिल्पचित्रातले धष्टपुष्ट अवयव या माणसातील जंतूवर दगडांचा वर्षाव करीत असतात !

आणि स्वतःजवळचे सगळेच गमावलेले असल्याने––आपल्याजवळ साधे पुष्ट अवयवही उरलेले नाहीत या अबोध जाणिवेने होरपळल्यामुळे–ती हिप्पी मंडळी अधिकाधिक विदूषकपणा करून लोकांचं लक्ष आपल्याकडे वेधून घ्यायचा प्रयत्न करतात, कारण स्वतःचं बोचरं लक्ष स्वतःपासून दूर पळवून लावण्याचा तोच तेवढा एक मार्ग उरलेला असतो !

. अजूनही तो 'वेडा' समोरच्या कागदावर रेषा काढतोच आहे. त्याचं काही केल्या समाधान होतंच नाही. समोर पहातो. तेव्हा त्याला शिल्पाचेच डोळे उगवतात. काय ते पहाणं ? आपल्या सबंध अस्तित्वाचाच तो डोळा करतो आणि एकेका धगधगणाऱ्या डोळचानं एकेक पृथुल स्तन पिऊन टाकतो सर्वांगाचा स्पर्श होतो आणि त्या स्पर्शाने समोर दिसणाऱ्या अप्सरेचा कटिभाग तो कवळतो नितंबांना अस्तित्वाचा वेढा पडतो त्याच्या आत्म्याने शरीरातील जे अशरीरी ते कवळून घेतलेले असते. ते आता त्याला कागदावर सौंदर्याच्या वक्र व धूसर रेषांनी निबद्ध करायचे असते. रेषा उठवून पुनः रेषेची मर्यादा त्याला झिडकारायची असते. रेषकरवी स्थितित्व रेखांकित करायचे पण तरीही कागदाची चतकोर मर्यादा उल्लंघून ती एक रेषा प्रवाहित होऊन दिशांच्या पलिकडे अवकाशाच्या कॅनव्हासवर ओघळत राहावी अशी एकच एक भक त्याच्या उरी असते !

हे होत नाही. साधत नाही.

त्याचे समाधान दूरच राहाते

म्हणून पुनः पुनः अस्तित्वाचाच डोळा करून ते शिल्प तो सळसळणाऱ्या रक्तात भिजवीत राहातो. आणि त्या भोगाच्या असीम आनंदाने त्याचा चेहरा पुनः खुलतो, अस्फुट हसतो, सगळे विसरतो नि कागदावर पुनः रेषा उमटते धावती, वक्र, वहाणारी, कमणीय

फक्त रेषा

. . फक्त रेषाच दिशांना बंध घालून अवकाशातला उन्माद बांधून ठेवू शकतात, म्हणून !

मग समोरून चार दोन लब्धप्रतिष्ठित पावलं टाकीत येतात. मंदिरासमोर शिल्पचित्रांना सन्मुख होऊन चालू लागतात. प्रत्येक जण अजाणताच इतका वेग घेतो की आपली घाई नि उत्सुकता दुसऱ्याच्या ध्यानी येऊ नये म्हणून पुनः पुनः उलटं वळून मागं राहिलेल्या एकाद्याकडे पाहून तो विनोदी भाषण करतो आणि तेवढचात दुसरे मात्र पुढं जाऊ नयेत म्हणून लगेच लगबग करतो. तुरुतुरु धावतोच.

आता ते मंदिरासभोवती सावकाशीनं प्रदक्षिणा घालत पहात आहेत.

जेव्हा साधीच शृंगारिक चित्रे समोर दिसतात तेव्हा ते मूकपणाने पहात असतात. अचानक मध्येच एखादं फार उत्तान संभोगासन समोर येतं.... ताठ, मदमस्त पुरुष आपलं पौरुष मग्रूरीनं जाहीर करीत असतो आणि आपल्या मदनमस्त, मादक अवयव-ऐश्वर्याला कणखर पौरुषाच्या वेदीवर स्वाहा करण्यासाठी कोणी धुंद, विवस्त्र अंगना त्याच्याकडे जात असते तिच्या त्या जाण्यात अपरिहार्यता उसळून उठलेली दिसते. दोन---तशाच विवस्त्र-सख्या तिला सोबत करीत असतात आणि

...आणि आणखी एक नवयौवना त्या कणखर पुरुषाची आक्रमक इंद्रिये आपल्या हाताने परजून त्याच्याकडे येणाऱ्या त्या अप्सरेच्या स्वागतासाठी सज्ज असते

'खजुराहो'च्या विश्वनाथ, वामन, नंदी इत्यादि मंदिरांच्या गोपुरावरील असली अतीव उन्मादक शिल्पचित्रं एकदम सामोरी आली की एरव्ही मूकपणानं पहाणारे ते लब्धप्रतिष्ठित लगेच अडखळून उभे राहातात आपण जणु काही पाहिलंच नाही अशा थाटात व आविर्भावाने ते परस्परांकडे तोंडं वळवतात मौलिक शास्त्र चर्चा करण्याचा आव आणतात

"गमत पहा. सातशे वर्षं ऊन पावसात उभी असूनही ही शिल्पचित्रं अजून इतकी मुलायम असावीत हं." एक म्हणतो.

"आणि दगड कोरलेला आहे किती नाजूकपणे. बघा तर खरा-" दुसरा गंभीर राहून त्या उत्तान चित्राजवळ जातो व दगडाचा नाजूकपणा पहाण्याच्या मिषाने गोल, गरगरीत, तोठरा बसवणाऱ्या त्या नितंबावर हाताचा पंजा टाकतो. आणि असं करतानाही केवळ कलासक्तीमुळं अभ्यासू म्हणूनच आपण नितंबाना स्पर्श केला आहे असं दुसऱ्यांना---त्यांनी विचारलेलं नसतानाही---सांगण्याचा प्रयत्न करतो.

"या संभोगासनांची उपपत्ती ठाऊक आहे का तुम्हाला ?" तिसरा, आपण प्रत्यक्ष संभोगचित्राबद्दल बोलायला कचरत नाही ---केवळ तत्त्वजिज्ञासा म्हणून---हे पटवण्यासाठी बोलतो.

"हा त्या काळातील विजिगिषु राजांचा उन्मत्त खेळ आहे" हे म्हणताना, जणु आपणच काही अपराध केलेला आहे व तो तात्त्विक पांघरुणाखाली लपवणं आपल्याला भाग आहे अशी त्याची धारणा असते.

"मुळीच नाही." दुसरा किंचित् वयस्कर इसम जिभल्या चाटणाऱ्या वखवखीनं जरा आक्रमक आवाजात ओरडतो, "जे आज तुम्हाला उन्मादक, विक्षिप्त, चमत्कारिक वाटतंय ना ते अगदी निकोप व नैसर्गिक समाजबंधनांचं, त्या काळातलं, चित्रण आहे. यात गर्हणीय काहीच नाही. आजची आपली विकृत कामभावना-" कोणत्या सुप्त वखवखीपोटी तो असं बोलतो कुणास ठाऊक ? शतकानुशतकांच्या समाजबंधनानी केवळ चाळवली गेलेली पण कायमची अतृप्त राहिलेली त्याची कामवासना संभोगाचा तो दगडी ठामपणा पाहून इतरांच्या नाकावर टिच्चून किंचित् तृप्त होते की काय ?

"असंही म्हणतात--"



## एक राग चित्र
## किर्वाणी

(खांसाहेब अलिअकबर, पं. धनंजय पुजारी, पं. शिवकुमार शर्मा)

अननस नारळ सुपारीच्या हिरव्या कंच बागेवरून
उडतो आहे पोपटांचा रक्तचंचु थवा.
ओलांडली जातात उंच उंच दक्षिणी गोपुरांची
अध्यात्म शृंग शैले
एका ईश्वरीय (किंवा निरीश्वरीयही) बालभावाने.
स्वता चैतन्यानेच नाकारावीत मोक्षादि घटपटांची
शुष्क व्याकरणे तसे पाखरांचे स्वानंदी सर्वानंदी
परिभ्रमण.
एक बंधन म्हणून ते स्वातंत्र्यही लादून घेतात
स्वतःवर आणि पिलू खमाजच्या दुआब- कक्षेतून
अलगद लागते विस्तारू एकेकाचे डाळिंबी
आलंबन.
एक बसतो जाऊन शिरजगावच्या दत्तमंदीरावर
दुसरा महयरच्या संस्कृती संकरांच्या मिनारावर
तिसरा मुंबईच्या रेकॉडिंग हाऊसच्या पंचकल्याणी
टॉवरवर.
दक्षिणेच्या गोपुरांना खुणावते अफगाणातील
भंगांश रक्तातील रहस्य (आणि त्यांची आदिम
ओळख पटते सारे सारे रक्त एकच
असल्याची.)
आणि दिशांचे सारे अभिनिवेश व्यामोह वितळू
लागतात एका आदिम चैतन्य स्रोतात
कधीचा उडतो आहेच अननस सुपारी नारळांच्या
बागेवरून पोपटांचा रक्त चंचु थवा.

-वामन इंगळे

"काय ?" त्याला उगीचच अडवून हा प्रश्न येतो. काहीतरी या विषयावर बोललं जावं अशी भयानक आतुर उत्कंठा

"की त्या काळात परमार्थ फार माजला. वैराग्य बोकाळलं. लोकसंख्या घटू लागली. म्हणून लोकांना उत्कटतेनं विषयोन्मुख करण्यासाठी---" ही उपपत्ती सांगताना तो अंमळ घाईच करतो. आपल्या दुबळ्या शिरावरचं परमार्थोन्मुखतेचं दडपण निवून आपल्यालाही किंचित् स्वैर विषयानंदाचा परवाना मिळाला तर बरं असं त्याला वाटत नसेलच असं नाही.

आपापसात एका ठिकाणी उभं राहून इतकी तत्त्वचर्चा करीत ते उत्तानचित्र पाहिल्यामुळं आता थोडं मानसिक धैर्य आलेलं असतं. निदान नजर तरी जरा मेलेली असते. म्हणून अधिक धीटपणानं ते सगळे ते चित्र पुनः पहातात.

आणि कदाचित् दुवळचा व भेकड कुडीतली पौरुषी रग इतक्यात मरगळून गेली असण्याचीही शक्यता असते. स्वतःतील आक्रमक जोषच थंड झाल्यावर श्लील काय नि अश्लील काय ? उत्तान काय नि सौम्य काय ? स्तन काय नि नितंब काय ? माणूस काय नि पत्थर काय

सगळ्या अस्तित्वाचीच चेतना झालेली त्या शिलाखंडावर बसलेली ती हरवलेली व्यक्ती आता कागद पुनः बाजूला करून समोर पहात स्तब्ध असते.

तिच्या सर्वांगालाच डोळे फुटलेले असतात नि त्यातून आत्म्याचे प्रकाशकिरण बाहेर फाकत राहतात

असं काय त्याला नेत्रसंपुटात साठवून घ्यायचं असतं कोण जाणे !

रेषा रेखाटून थकलेला तो विमनस्क बसून राहातो त्याच्या पसंतीला न उतरलेल्या रेषांचा तो कागदी पसारा बाजूला पडलेला असतो. वाऱ्याची मंद झुळूक हिरव्या कुरणावरून लहरत येते आणि चार दोन कागद उडवून नेते त्याचं तिकडे लक्षच नसतं. कागदावरील चार वक्र नि ओघवत्या रेषा क्षितिजाकडे धाव घेत उडत जातात क्षितिजरेषेला भेटण्यासाठी

## रजतमहोत्सवी वर्षानिमित्त पुढे प्रसिद्ध होणारे विशेषांक

**चालू वर्ष हे 'दीपावली'चे रजतमहोत्सवी वर्ष असून त्यानिमित्त आतापर्यंत 'वर्षारंभ विनोद विशेषांक' (मार्च), 'वायुसेनादल विशेषांक' (मे) आणि 'संगीत विशेषांक' (जून) असे खास अंक प्रसिद्ध झाले. या सर्व विशेषांकांचे रसिकांनी उत्साहपूर्ण स्वागत केले याबद्दल त्यांना धन्यवाद ! या रजतमहोत्सवी वर्षात यापुढे खाली नमूद केल्याप्रमाणे आणखी विशेषांक प्रसिद्ध होतील :-**

| | |
|---|---|
| ऑगस्ट | म. गांधी जन्मशताब्दी विशेषांक |
| नोव्हेंबर | रजतमहोत्सवी दिवाळी अंक |
| डिसेंबर | खास क्रिकेट पुरवणी |
| फेब्रुवारी | गणराज्य-दिन विशेषांक |

**आपले अंक राखून ठेवा. निराशा टाळण्यासाठी वार्षिक वर्गणीदार होणे फायद्याचे ठरते**

"अरे, तो पहा तो चक्रम ! आपण चार देवळांना प्रदक्षिणा मारून आलो तरी अजून तसाच आहे."

"महान् कलाकार दिसतात "

"भ्याड आहे झालं कलाकार म्हणे.

"चला बघू या काय काढलंय ते."

"मरू द्या. त्यापेक्षा समोर बघा."

"आयला, भूक लागली. खायला हवं."

"समोर चला. ते बघा हॉटेल."

"आजा, आजा रे. तुझको पेरा प्यार पुकारे होऽऽ"

इतक्यात पाऊस सुरू झाला. विस्तीर्ण हिरवळीवर झिमझिम धारा बरसू लागल्या. सृजनाचा थेंब आकाशातून धरित्रीवर पडला. मंदिरांची गोपुरे भिजून चिंब झाली. अधेमधे घोटाळणाऱ्या काही पुंजऱ्यांची धावपळ झाली. किंचाळत, पळत त्यांनी आसरा शोधला धारा आणखी वाढल्या.

एका प्रभूत शांतीत अवकाशाच्या उदरी गर्भसंभव होत होता

आता फक्त तोच तेवढा अजूनही त्या शिलाखंडावर तसाच बसून होता. धारांनी निथळत पण अजूनही एकटक समोर पहात लांबसडक पर्जन्यधारांनी मंदिरांचे घुमट धूसर झाले होते. अप्सरा नि गंधर्व, उन्मत्त भोगासने नि उद्दीपित इंद्रिये, संभोगासनांची सविस्तर चित्रमालिका, चेहऱ्यावरचे आतुर, उत्कंठ, तृप्त, ऋणाईत भाव विभाव सगळं अस्पष्ट झालं होतं. सगळ्यावरून अधिक व्यापक व मौलिक अशी सृजनधारा ओसंडत होती

त्याच्या चेहऱ्यावरचं किंचित् हास्य आता पूर्ण विरमतं ! त्या दोन पिपासू डोळयांसमोर विश्वच एक भोगडोळा होऊन उभं राहातं. तो चकावतो. गंभीर हुंकार देतो कागदाचे चतकोर वाऱ्यावर हेलपाटत जाऊन आता पाण्यात भिजून चिंब झालेले असतात

शिल्पचित्रातील ज्या मीलनरेषा वक्र नि वहात्या–त्याला ओंजळीत साठवून घ्यायच्या असतात त्या इतक्या वाढतात, वाढतात

क्षितिजरेषा कोणती, धर्तीचा परीघ कोणचा, स्तनाची गोलाई कुठं संपते, नितंबाचा आकार कुठं अस्पष्ट होतो, थरथरणारे ओठ जेव्हा एकमेकावर घट्ट विसावतात, जेव्हा दोन नि दोन चार हातांच्या कवेत 'शरीर सारे म्हणते पाज' तेव्हा तेव्हा

"व्यर्थ नव्हे का ओंजळ तेथे !"

....तो उठतो. अजूनही तसाच हरवलेला. आता नजर दिशांच्या पलिकडे असलेली दिशा न्याहाळत असते. तो धडपडत चालू लागतो. मंदिरापासून दूर. हिरव्या मैदानापासून लांब एका झाडाखाली, बहुधा मधुचंद्रासाठी आलेलं एक जोडपं, पावसाला भिऊन उभं असतं. अगदी बिलगून. त्याला पाहून ती लाजते पण विश्वासानं नवऱ्याच्या कवेत शिरते ..त्याला काही दिसतंच नसतं. तो चालू लागतो

(पृष्ठ ३६ वर पहा)





# गोव्याची आनंद-यात्रा

आपली मुट्टी कितीहि लहान मोठी असो,
आपलें अंदाजपत्रक कितीही लहानमोठें असो —
आपली गोव्याची सफर आनंददायकच होईल
याची आम्हाला खात्री आहे.
गोवा सरकारच्या पर्यटन विभागानें आपणासाठी
कितीतरी सुखसोयी उपलब्ध केल्या आहेत.



* प्रेक्षणीय स्थळांना भेटी देण्यासाठीं आयोजित केलेल्या खास बसगाड्या; त्यांसोबत प्रशिक्षित मार्गदर्शक.
* मांडवी नदींतून जलक्रीडा.
* पाण्यावरील घसरगुंडीचा खेळ खेळण्यासाठीं वेगवान बोटी (वॉटरस्कीइंग).
* पणजी व कळंगुट येथे अत्याधुनिक निवासस्थानें.

हें सारें थोड्या पैशांत व थोड्या वेळांत उपभोगण्याची सुवर्णसंधि म्हणजेच गोव्याची आनंद-यात्रा !

(गोवा, दमण आणि दीव सरकारच्या माहिती आणि पर्यटन विभागातर्फे प्रकाशित)

....सिंधू रडतच होती.... तिला कुरवाळत तो म्हणाला, "सिंधू, मला तुझा फार अभिमान वाटतो ग! माझ्या वागण्यामुळे तुला यातना होतात आणि तरीही तू...."








ग. का. भडकमकर

दर रविवारप्रमाणे अण्णा सकाळीच आंघोळ करून घाईघाईने निघाला.

दर रविवारी अण्णा पहाटेच उठतो. मग आपल्या रात्री त्याला कितीहि जाग्रण घडलेलं असो. रविवारी दुपारी त्याला रेसकोर्सवर घोड्यांवर पैसे खेळायला जायचं असतं. तिकडे जाण्यापूर्वी सर्व जाणकारांच्या घरी तो पायधूळ झाडून येतो.

अण्णा अंधाऱ्या, फरशीच्या जिन्यावरून गडबडीनं उतरत असतानाच वर येणाऱ्यां सिंधूनं त्याला खुणेनंच थांबा म्हणून सांगितलं. ती कुठलं तरी स्तोत्र पुटपुटत होती. अपशकून झाल्यासारखा अण्णा जागीच थबकला. आणि दोन पायऱ्या मागे चढला. सिंधूनं पदराच्या टोकाला बांधलेली गाठ सोडून पुडीतला अंगारा अण्णाच्या कपाळी लावला. आणि झारीतलं तीर्थ देण्याकरता हात वर उचलला. अण्णाला हे असले प्रकार अजिबात आवडत नव्हते. एरव्ही त्यानं सिंधूशी वितंडवाद घातला असता; पण यावेळी त्याचं काही चालणार नव्हतं. त्यानं मुकाट्यानं तळवा पुढे केला. तळव्याच्या खळग्यातलं तीर्थ ओठांना लावून तोच हात डोळ्यांवरून आणि मस्तकावरून फिरवल्यासारखा केला. आणि, आता जाऊ? अशा अर्थी सिंधूकडे पाहिलं. सिंधूनं त्याच्याकडे पाहून स्मित केलं. वाट पाहू नकोस, असं सांगून अण्णा पूर्वीच्याच गडबडीनं झपझप जिना उतरून गेलादेखील.

सिंधू वर आली. तिला स्वयंपाक करावयाचा होता. लली आणि वंदन यांना दूध द्यायचं होतं. पण तिला अचानक ओकं ओकं, भकास, भीषण आणि गळून गेल्यासारखे वाटू लागलं. शक्तिपात झाल्यासारखी ती दाराच्या चौकटीला डोकं टेकून सुन्न उभी राहिली.

अण्णाचं रेसचं वेड काही महिन्यांपूर्वीच सिंधूला कळलं होतं. त्या वेडापायी तो वेड्यासारखा, बेलगाम वागत होता. संसाराकडे, मुलांकडे, सिंधूकडे लक्ष द्यायला त्याला वेळ मिळत नव्हता. वेळ असला तरी तो रेसची इंग्रजी–मराठी कात्रणं आणि पुस्तकं वाचत पडे. ऑफिसला देखील तो वेळेवर आणि रोजच्या रोज जात नाही हेही तिला कळलं होतं. तिनं तो विषय त्याच्याजवळ काढला की, तो एकदम खेकसत असे, "तुला काय करायचंय्? वेळच्या वेळी तुला सगळं मिळतंय् ना?"

'पण मला तसलं नकोय् हो. तुम्ही माझ्या मनाप्रमाणं वागायचंच् नाही असं ठरवलंय् का?"

"हो" अण्णा चिडून उत्तर देई, "तुझ्या मनाप्रमाणे वागणारा नवरा मिळत असेल तर घेऊन ये कुठून तो." आणि नाराजीचे शब्द पुटपुटत ताडताड निघून जाई. अण्णाच्या तिरसट उत्तरानं सिंधूचं पुढचं बोलणं खुंटून जाई. 'त्याच्यापेक्षा तुमचं हे वागणं सहन करणारी दुसरी बायको कां नाही आणत तुम्ही' असं उलट उत्तर तिच्या ओठी आलेलं असे पण ते ऐकायला अण्णा नसे. स्वतःवरच संतापत ती वावरू लागे. लली आणि वंदन दिसले की सगळा राग त्यांच्यावर काढी. त्यांना बदाबदा मारू लागे, त्यांना फराफरा ओढून ढकलून देऊ लागे. लली आणि वंदन भेदरून रडत रडत एकमेकांना बिलगून बसलेली कोपऱ्यात पाहिली की सिंधूला, अण्णाचा, त्याच्या वागण्याचा, तिरसटपणाचा विसर पडे आणि ती त्यांना छातीशी घट्ट घट्ट धरून ठेवी. स्वतःला आणि त्यांना गदमरवून टाकी. मधूनच आई असं कां करते याची त्या मुलांना काय कल्पना येणार? अण्णाला विसरून सिंधू स्वतःला मुलांच्यात रमवून टाकी, आणि त्यांचे लाड करी. दोन्ही मुलांच्या अंगावरून हात टाकून ती त्यांच्याकडे एकटक पाहात राही. त्यांच्या भवितव्याच्या विचारांचं काळं सावट तिच्या डोळ्यांवर अलं की ते बरसू लागत. तांबड्या, रों रों करीत धावणाऱ्या पुराच्या लोंढ्यात आपला सगळा संसार वाहात आहे, सगळ्याची वाताहत होत आहे असं तिला दिसू लागे आणि त्या कल्पनेसरशी तिचे हात मुलांना आणखी जवळ ओढीत अश्रू गालावरच सुकून जात.

सिंधूला पूर्वीचा अण्णा आठवला की, तिचं तिलाच हसू येई. लग्नानंतरचे दिवस तिला आठवत. अण्णाच्या धसमुसळ्या शृंगाराला रात्र पुरत नसे. त्याच्या आक्रमक वृत्तीनं, पौरुषत्वानं तिला भारल्यागत वाटत राही. शृंगाराचे इतके चाळे याला कसे बाई ठाऊक या विचारानं आपलं अवघं शरीर त्याच्या शरीरात मिसळून टाकण्याकरता ती त्याच्या जवळजवळ सरके. सगळं शरीर त्याच्यात एकरूप करून टाकी.

आपल्याला लली झाली तेव्हा आपण पहिली मुलगी झाली म्हणून रडलो. पण अण्णानं समजूत काढली. पहिलं बाळंतपणं म्हणजे बायकांचा पुनर्जन्म असतो वगैरे वगैरे सांगून ललीकडे डोळे भरून पाहून आपल्याकडे मान करताना तोच किती लाजला होता. सिंधू ऽ ऽ असं अस्फुट उच्चारून आपल चुंबन घेतलं होतं. आपलं डोळ्यातलं काजळ, लांब बाह्यांचं पोलकं, धुरीचे वास यावरून किती चेष्टा केली होती.

वंदनच्या वेळी तो दवाखान्यात आला होता तेव्हा नुसता खाटेवर बसून खिडकीतून पलिकडे पाहात होता. आपल्याशी बोलला नाही. वंदनला पाहाण्याची उत्सुकता दाखवली नाही. कारण त्यावेळी तो रेसच्या नादात सापडला होता. त्याच्याकडे पैसे नव्हते. आपलं बाळंतपण हे जणू त्याच्यावर संकटच कोसळलं होतं. नुसतं बसून कंटाळा आला तेव्हा तो उठला, आणि म्हणाला, "मी चलतो. उद्या संध्याकाळी येईन पुन्हा."

"कशाला?" आपण विचारलं, "नुसतं खाटेवर बसून राहायला?"

"हं ऽ ऽ" असं तो सुस्कारला आणि बोलला, "तुला घरी न्यायला अजून सात आठ दिवस आहेत. पैशांची काहीतरी सोय करायला हवी. बघतो मी." तो निघून गेला. अण्णा पैशाच्या अडचणीत आहे. पुढच्या खर्चाची त्यानं तरतूद करून ठेवलेली नाही हे आपल्याला जाणवलं. तो पुन्हा दवाखान्यात आला तेव्हा आपण त्याला आपल्या सोन्याच्या बांगड्या गहाण ठेवण्यासाठी दिल्या. प्रथम तो चमकलाच. नाही म्हणाला. आपण त्याला समजावलं. मग तो कसाबसा तयार झाला. बांगड्या घेताना त्यानं आपले हात धरले. त्यांचा मुका घेतला. ह्या मी लवकरात लवकर सोडवून आणीन असं कृतार्थतेनं भरत आलेल्या डोळ्यांतलं पाणी आवरीत म्हणाला. आपल्याला धन्य धन्य वाटलं. अण्णा आपलाच आहे, त्याच्या वागण्यात आपल्याला बदल घडवून आणता येईल ह्या विचारानं आपल्याला हलकं हलकं वाटलं. वंदनच्या रडण्यानं आपण भानावर आलो.

रात्रीचे दहा वाजून गेले होते तरी अण्णा परत आला नव्हता. सिंधू त्याची वाट पहात बसली होती. मुलं झोपली होती. वाट पाहू नकोस असं जरी अण्णा सांगून गेला होता तरी त्याची वाट पाहात सिंधू उपाशी पोटी बसली होती. संताप आणि संयम यांचं अजब मिश्रण होतं सिंधू म्हणजे! यांची सगळी अक्कल त्या घोड्यांपुढे धावते आहे हा विचार, आणि बिचारे दुपारी जेवलेत् तरी की नाही कुणास ठाऊक हा दुसरा विचार, हे दोन्ही विचार ती एकदमच करीत होती. अन्नाच्या गारगोट्या झाल्या होत्या.

अण्णा आला. नेहमीप्रमाणेच निराश मःनस्थिती. सिंधूनं काय ते ओळखलं. सिंधू आपल्यासाठी सकाळपासून उपाशी आहे हे कळल्यावर अण्णाला शरम वाटली आणि अकारण संतापही झाला. "हजार वेळा तुला सांगितलं. माझी वाट पाहात जाऊ नकोस. माझ्यासाठी तू उपाशी राहात जाऊ नकोस. ऐकत नाहीस. आलीय् मोठी पतिव्रता! गडकऱ्यांची सिंधू जशी काही! अण्णाच्या तोंडून शब्द फुटत होते. हुंदका द्यायचं त्राणही सिंधूत नव्हतं. तिचे डोळे ओलावले. पान मांडत ती म्हणाली, "जेवून घ्या आधी. तुम्हाला खूप त्रास होतो ठाऊक आहे मला."

अण्णा पानावर बसला. पहिलाच घास तोंडाजवळ नेताना त्याला दुपारी कँपातल्या



## पानपतची लढाई

**इतिहासाच्या शिक्षकानी ।
वर्गात एकदा पृच्छा केली,
ठाऊक आहे का, बाळानो तुम्हा,
कशी घडली पानपतची लढाई ?
एक मुलगा मध्येच उत्तरला,
हा इतिहास जुना नाहीं,
परवा परवाच घडली येथे,
इतिहासाची पुनरावृत्ती ।
जोरात पावसाची सर आली,
इकडे तिकडे धावपळ उडाली ।
बससाठी शेडमध्ये,
भली मोठी रांग लागली ।
बसआली बस आली,
एक तरुणी रांगेत घुसली,
कवळी पडली, गंगावनास मुकली,
छातीवरची पॅडे निसटली ।
सॅंडल हरवली, इयरिंग तुटली,
भारी ब्लाउजची चाळण उडाली;
पर्स कुणी हिसकावून घेतली,
म्हणती घडली 'पौनपतची लढाई'**

**—विंदा दीक्षित**

इराण्याच्या हॉटेलात श्रीमंत मित्रांवरोबर हसत खेळत खाल्लेलं आमलेट, बिर्याणी, मुर्गी आठवली. त्यावेळी आपल्याला सिधूची, वंदनची, ललीची आठवण कशी झाली नाही या विचारानं तो शरमिंदा झाला. आपण जेवलो की नाही या काळजीनं सिधू उपाशी राहिली, रात्रीचे दहा वाजून गेले तरी या अंधाऱ्या वाड्याच्या अगदी वरच्या मजल्यावरच्या या बिऱ्हाडात भुतासारखी एकटी बसून राहिली हे कळून त्याचा हात तसाच थांबला. तो हात तसाच सिधूच्या तोंडाकडे नेत तो म्हणाला. "घे—घे ना." सिधूनं तोंड फिरवलं.

"मला माहीत आहे. माझ्यावर रागावतेस तू. माझं वागणं तुला आवडत नाही. माझ्याजवळ पैसे नाहीत. तुझ्या मनासारख्या गोष्टी मला घेऊन देता येत नाहीत तुला म्हणून तू ....

"नाही हो नाही. तसं नाही" सिधूनं त्याचं बोलणं तोडलं. "कसं सांगू तुम्हाला.." पुढचं बोलणं न सुचल्यामुळं तिनं अण्णाचा हात आपल्या तोंडाजवळ नेऊन घास घेतला. अण्णाला बरं वाटलं. तो तिला एकामागून एक घास भरवू लागला. तिला त्यानं पाणी दिलं. पहिल्या घासाबरोबरच तिचा दिवसभराचा उपास सुटला होता. "आज तुमचं रेसकोर्सवरच पोट भरलेलं दिसतंय्" सिधूनं असं म्हणताच अण्णा एकदम नर्व्हस् झाला. एकदम गप्प गप्प. सिधूला वाईट वाटलं. "असं हो काय ?" म्हणून तिनं एक घास त्याच्या तोंडाजवळ नेला. "अण्णासाहेब, हं ऽऽ हा चिमणीचा, घ्या लौकर, अशं काय बलं ?" अण्णा विरघळला. क्षणापूर्वीचा मनातला क्षोभ दवला. तिच्याकडे पाहात त्यानं तोंड उघडलं. घास घेता घेता खुलून म्हणाला, "आज फार सुन्दर दिसतेस तू."

"हं ! बायकांच्या पोटात दिवसभर काही नसलं ना की त्या सुन्दरच दिसतात."

"आई ग!" सिधू अस्फट किंचाळली. अण्णानं तिचं बोट चावलं होतं. तिच्या खांद्यावर डावा हात ठेवूनच तो उठला. आणि हात धुवायला गेला.

रात्र रंगणार होती ....

अण्णाच्या आवेगाच्या, गाढ मिठीत असताना, त्याच्या हृदयाचं स्पंदन ऐकतानाच सिधू म्हणाली, "माझ्या बांगड्या तुम्ही केव्हा सोडवून आणणार आहात ?" प्रश्नासरशी अण्णाची मिठी सैल झाली. त्याची धुंदी, उन्माद क्षणार्धात् ओरवडला गेला. खर्रकन् त्याचा मड गेला. 'त्या' मूडमध्ये त्याला फक्त 'तो'च विचार पाहिजे असे. संसार, कटकटी, रेस, पैशांची ओढाताण फक्त तो मूड त्याला विसरून जायला लावी. चढत चाललेला उन्माद एकदम खाली आल्यामुळे त्याला चवताळायला झालं.सटकन् सिधूला दूर सारून तो खिडकीतून पलिकडे पाहू लागला. सिधूला वाटलं होतं त्या मूडमध्ये तो असतानाच त्याला बांगड्यांचं विचारावं. तो हो म्हणेल. काही तरी करेल. आणि नेमक्या त्याच प्रश्नानं तो बिघडला होता. तिला अनपेक्षित प्रकारानं वाईट वाटलं. त्याच्या मागे जाऊन त्याच्या पाठीवर डोकं टेकीत ती म्हणाली, "एवढ्यातेवढ्या गोष्टीवरून तुमचा मूड कसा जातो हो ? वंदन आता वर्षाचा होऊन गेला. बांगड्या सोडवून आणल्यात का ? उलट भरीला माझा हार आणि आंगठी गहाण टाकलीत. तुम्ही असेच वागत राहिलात तर कसं व्हायचं आपलं ? लली आणि वंदनची शिक्षणं व्हायचीत्. आताच आपलं असं आहे पुढे काय होणार आहे याचा तुम्ही कधी गंभीरपणानं विचार करता का ?"

"सगळं काही कळतंय् मला" अर्धवट सुटलेल्या मूडमुळे चवताळलेला अण्णा गुरगुरत कॉटच्या कोपऱ्यावर बसत म्हणाला, "मला माहीत आहे. मी रेस खेळायला जातो, पैसे घालवतो. कर्जबाजारी झालोय्. -तू तुझे दागिने मला गहाण ठेवायला दिलेस. त्या उपकाराखाली दबतोय् मी. तुझा नवरा म्हणून माझी किंमत काही नाही. मी नालायक आहे हेच म्हणायचं आहे ना तुला ? थोडी थांब, माझे ग्रह आता पालटतायत्. चांगले योग येताहेत. पुढच्या महिन्यातल्या रेसमध्ये मला पैसे मिळतील असं ज्योतिषानं सांगितलं आहे." सिधू रडतच होती. तिला कुरवाळत तो म्हणाला, "सिंधू, मला तुझा फार अभिमान वाटतो ग ! माझ्या वागण्यामुळे तुला यातना होतात आणि तरीही तू ....." त्याच्याजवळून बाजूला होत खाली ती मुलांजवळ लवंडली. अण्णा कॉटवर आढ्याकडे पाहात पडला.

रात्र तळमळत चालली होती.

केव्हातरी सिंधूनं पाहिलं. अण्णा खिडकीच्या अंधुक प्रकाशात रेसची पुस्तकं आणि कात्रणं वाचत होता.

अण्णा रेसच्या दुष्टचक्रात सापडल्यापासून बेताल वागत होता. घरच्या कटकटी, पैशांच्या अडचणी, सिंधूचा अबोला, कधीतरी बोलणं पण ते बोचरं, धारदार ! घेणेकऱ्यांचे खेटे, त्यांना चुकवणं यापायी त्याला जास्तीत जास्त वेळ घराबाहेरच राहावं लागे. सगळ्या अडीअडचणींवर



अनुक्रमणिका

एकच उपाय होता. पैसा ! एकदम पैसा ! एकरकमी हजारो रुपये ! यातूनच त्याला रेसबरोबर ज्योतिषाचा नाद लागला. आपले फलदायी ग्रह विनमध्ये धावून येणाऱ्या घोड्याप्रमाणे कां धावून येत नाहीत ह्या विचारानं तो अस्वस्थ होई.

आणि सिंधूदेखील ज्योतिषांकडे जाऊ लागली. आपला नवरा कधी सुधारेल हे विचारण्यासाठी. तिची व्रतं, उपास, अंगारे, धुपारे, तीर्थ सगळं चालू झालं होतं. आपले अशुभ ग्रह यांच्या रेसच्या घोड्याप्रमाणे वेगानं कां पळून जात नाहीत याचं तिला आश्चर्य वाटत राही."

असंच चाललं होतं. ताण वाढत होता.

रात्रीचे साडेबारा वाजून गेले होते. दाराची कडी वाजली. पण सिंधूला उठवेचना. उठावसंच वाटेना. आतल्या पेटत्या क्षोभानं तिचं शरीर अचेतन केलं होतं. सगळ्या यांत्रिक, कळ फिरवल्याप्रमाणे होणाऱ्या हालचाली. तिनं दार उघडलं. अण्णा आत आला. कपडे काढून, घटाघटा पाणी पिऊन तो कॉटवर, सुस्कारा सोडत थकल्यासारखा आई ऽऽग असं उद्गारत आडवा झाला. सिंधूनं ते ऐकावं, स्वतःहून आपल्याजवळ यावं ही त्याची अपेक्षा. ती अविचल, डोळे टक्क उघडे ठेवून आढ्याकडे पाहात शांत पडली होती. . . वाह्यतः शांत. आतून, निराशा, अपेक्षाभंग ज्योतिषांच्या सांगण्याप्रमाणे यथासांग करीत असलेल्या व्रतांचं, उपासाचं वांझोटं फळ मिळत असल्याचं दुःख, शारीरिक क्लेश यांचे धडधडते अंगार. आतल्या आत जळणं ! अण्णाला ऐकू जाईल अशा स्वरात ती म्हणाली, "पंधरा दिवसानी कमीचं लग्न ठरलं आहे. बाबांचं आजच पत्र आलं आहे. आपल्याला बोलावलं आहे. पुढच्या रविवारी मी दुपारच्या गाडीनं जाणार आहे. माझ्या बांगड्या, हार, आंगठी तोपर्यंत सोडवून आणा. तुम्हाला निक्षून सांगते. पुढच्याच रविवारी मी माहेरी जाणार आहे.दागिन्यांसह माहेरी जाणं जमलंच नाही तर . . . तर . . . या जगातूनच मी निघून जाईन. सहन होत नाही हो मला." दुःखाचं पण निश्चयाचं तिचं बोलणं ऐकून अण्णा विलक्षण दचकला. गोठून गेला. तिच्या कायमच्या जाण्याच्या कल्पनेनं तो दरदरून घामेजला. ओठ कोरडे पडले. थरथरत्या पायांनी तो तिच्यापाशी बसला. तिच्या खांद्यावर हात ठेवत त्यानं हाक मारली; "सिंधू ऽऽ ! माझं ऐकतेस का ?"

"मी काय बोलले ते ऐकलंत ना ? जा. झोपा मुकाट्यानं. मला त्रास देऊ नका." असं बोलून ती कुशीवर वळली.

शनिवारी ऑफिसला जाण्याकरता बाहेर पडताना सिंधूला अण्णानं सांगितलं, उद्या जाण्याऐवजी परवा सकाळच्या गाडीनं जा. मलाही रजा मिळणार आहे. आपण सगळे बरोबरच जाऊ."

"शक्य नाही ते. मी उद्याच जाणार"

"पेढी आज आणि उद्या बंद आहे. तुझे दागिने सोडवून आणायचे आहेत."

"थापा मारू नका. इतके दिवस काय केलंत ? मी तुम्हाला अगोदरच सांगितलं होतं."

"खरंय् ते. पण माझी पैशांची सोय होऊ शकली नाही."

"आता मला विका".

'सिंधू ऽऽ ! चीड आणणारं आणि पौरुषत्वाची शून्य किंमत करणारं ते वाक्य ऐकून अण्णा उफाळला आणि थिजलाही. एकही शब्द न बोलता तो धाडधाड जिना उतरून निघून गेला. पाण्याच्या भोवऱ्यात खाली खाली जाणाऱ्या माणसाप्रमाणे त्याला घोंगावणारं पाणी आणि काळामिट्ट् काळोख यांचा भास होत राहिला.

ऑफिसात अण्णाचं मन शांत झालं. सिंधूची समजूत काढण्याची त्याला आशा वाटली, हुरुप वाटला. पैशांची सोय अद्याप झाली नव्हती. दागिने सोडवून आणण्याचं काय करायचं ते त्यानं देवावर आणि दैवावर सोपवलं. तो ज्योतिषाकडेही जाऊन आला. घरी येताना अण्णा सिंधूकरता गजरा घेऊन आला.

सिंधू बराच वेळ बोलली नाही. नंतर तिनं पानं मांडली. अण्णाला, मुलांना तिनं जेवायला बोलावलं. जेवताना त्यानं ललीला आणि वंदनला, परवा सकाळच्या गाडीनं मामाकडे जायचं असल्याचं सांगितलं. हे सांगताना त्यानं सिंधूकडे पाहिलं. ती खुलली होती. अण्णाला ती आग्रहानं वाढू लागली. नजरेनं त्याच्याशी बोलू लागली. अण्णाला बरं वाटलं. सगळं विनासायास घडत असल्याचं पाहून तो खुशीत आला.

रात्र रंगली. अनपेक्षितपणे रंगली. अधीर, उत्कट, उन्मादक उबदार स्पर्शांनी अवघे अवयव फुलून फुलून आले. साक्षात स्वर्गही त्या खोलीत स्तंभित होऊन, कोपऱ्यात बापुडवाणा होऊन राहिला होता.

टॅक्सी फार हळू धावते आहे असं अण्णाला वाटत होतं. त्याचं शरीर

त्या टॅक्सीत वसलं होतं. टॅक्सीच्या वेगानंच ते प्रवास करीत होतं. ते रस्त्यातल्या अडथळ्यांना, वळणांना, पोलिसांच्या हातांना सिग्नलराना तोंड देत येत होतं. त्याचं मन केव्हाच आपल्या विन्हाडात पोचलं होतं. ते धुंदपणे सिधूला मिठीत घत होतं. तिच्यावर नोटांचा वर्षाव करीत होतं. मुलांबरोबर फर धरून नाचत होतं. तन्हतन्हेचे पोशाख त्यांच्या शरीरावर दिसत होते. लग्नाच्या वेळचा हार, वांगड्या, आंगठी याव्यतिरिक्त सिधू दागदागिन्यांनी आणि उंची वस्त्रांनी मढून निघत होती. शवरीच्या मऊ कापसासारख्या भूमीवरुन अण्णा आणि सिधू मंद पावलं टाकीत हातात हात घेऊन धुक्यासारख्या दिसणाऱ्या त्या स्वप्नभूमीत प्रवेश करत होती. पृथ्वी आणि तिचे व्यवहार क्षुद्र वाटावेत इतक्या उंचीवर ती जाऊन पोचली होती. अजाण मुलाच्या भूमिकेतून ती तो विश्वव्यापार कुतुहलानं पाहात होती उद्या सकाळच्या गाडीनं सिधूच्या माहेरी जायचं.

टॅक्सी वाड्यासमोर थांवली. दरवाजात खूप लोक उभे होते. ते सगळे टॅक्सीभोवती जमले. हातातल्या बॅगेसकट खाली उत्साहानं उतरणाऱ्या अण्णाला एकजण हलकेच म्हणाला, "अण्णा, सिधूवहिनीना दवाखान्यात टाकलं आहे. दुपारी शेगडी पेटवताना त्यांना भाजलं. तुम्ही कुठं होतात ? रेसकोर्सवरही सापडला नाहीत." उंच उंच जाणारा फुगा फटकन् फुटावा तसं अण्णाचं मन फुटलं. फुगलेला अण्णा एकदम् आकुंचला. अशुभ कल्पनांची कावकाव त्याचे कान किटवू लागली.



दवाखान्यात अण्णा सैरभैर हिंडू लागला. वाड्यातले परिचित चेहरे दिसताच तो तिकडे धावला. सारं शांत, असह्य, गंभीर. तिथल्या खोलीत सिधू होती ..आणि नव्हतीही.

सिधूच्या चेहरादेखील अण्णाला पाहवेना. मग वाकीचं शरीर. ? घराच्या खिडकीतून येणाऱ्या चांदण्यांत अनिमिष नेत्रांनी रात्ररात्र अण्णा सिधूचं संगमरवरी शिल्पासारखं शरीर पाहात वसे. आणि आता भरीत करण्यासाठी भाजलेलं वांगं सोलून ठेवावं तसं ते शरीर दिसत होतं. ह्याच शरीरावरोवर आपण शृंगार करीत होतो ह्या कल्पनेनंच तो शहारला आणि मटकन् वसला.

अण्णाला घरी सिधूची चिठ्ठी मिळाली. मी हे जग सोडून जात आहे. जाणं भाग आहे. कारण मी तसा शब्द दिला होता. रविवारीच दुपारच्या गाडीने दागिन्यांसह माहेरी जाईन नाहीतर या जगातूनच निघून जाईन. तुम्ही दागिने काल रात्रीही सोडवून आणले नाहीत. आज सकाळीच वाहेर निघून गेलात. रात्रीशिवाय तुम्ही येणं शक्य नाही हे मी खात्रीनं जाणते. मी जाते आहे. कालची रात्र माझी होती ती मी पुरेपूर उपभोगली. माझा तुमच्यावर राग नाही. मी माझ्या दैवावर रागावले. सगळं असह्य झालं हो मला. आतून मी जळतच होते, आज वाहेरूनही जाळून घेते आहे. मी गेल्यानंतर एक करा. दुसरं लग्न करू नका. तुम्ही कसेही असलात तरी आत्तापर्यंत माझेच आहात. अखेरपर्यंत माझेच राहा. लीला आणि वंदनला वावांकडे पाठवा, आणि त्यांना भेटायला जात जा. मुलांना सांभाळा. चिठ्ठी लिहिताना त्या दोघांना मी खाली खेळायला पाठवलं आहे. त्यांना पाहावंसं फार फार वाटतंय् हो. पण पण... तो मोह नको. मुलांना सांभाळा. त्यांची आई अभागी आहे. स्वत:लाही सांभाळा.." पुढची सगळी अक्षरं अश्रूत वाहून जात होती. अण्णा ढसढसा रडत होता.

काल आणलेला गजरा सुकून गेला होता.

वॅगेतल्या नोटांच्या पुडक्यांखाली आपला जीव घसमटतो आहे असा अण्णाला भास होत राहीला. ● ● ●







पत्रें लवकर पेटींत टाका
कामाच्या शेवटच्या तासांत,
संध्याकाळीच जास्ती पत्रे टपाल
पेटयांत टाकली जातात. ही टपाल-कचेऱ्यां-
पुढील एक मोठी समस्या आहे. त्यामुळे
डाकेची गर्दी होते व विलंबही संभवतो.
टपालात पत्रे लवकर टाकल्याने तीं
त्याच दिवशीच्या डाकेने रवाना
होण्याची खात्री असते. तसे केल्याने इष्ट
स्थळी ती उशीर न होता पोहचतात.
पत्रे आताच टाका, संध्याकाळपर्यंत कशाला थांबता ?
भारतीय टपाल व तार खाते
davp 69/19

....क्तियेक घटना
एकदम घडल्या म्हणजे
प्रसिद्धीबाबत त्यांच्यावर अन्याय
होतो; तो टाळण्यासाठी
'घटना-नियंत्रण' मंडळ स्थापन
करावे ... एका प्राध्यापकांची ही सूचना....

# असो! एक गर्भपात..

— श्रीराम कामत

माझा एक मित्र प्राध्यापक आहे.

तो माझा मित्र आहे या गोष्टीवर जाऊ नका. कारण गृहस्थ बुद्धिवान आहे, व्यासंगी आहे. आपण 'जिनीयस' वगैरे कोणीतरी आहोत असा ह्याचा समज आहे.

आता मला यात काही कळत नाही. उपसंपादक असलो तरी टोपल्या टाकण्याचे कामच करीत आलो होतो. पाळ्या बदलत, जाग्रणे होत, पगारदेखील नेमेची होई असे नव्हते. अशा मामल्यात आपल्याला काही कळते ही जाणीव स्वंथ करायलासुद्धा माझ्यापाशी उरली नव्हती.

तर हे राहू द्या!

परवा (बहुधा शनिवारी. हा माझा साप्ताहिक सुट्टीचा वार.) बऱ्याच दिवसांनी या प्राध्यापक मित्राकडे मी खेप टाकली.

तो घरीच होता. आरामखुर्चीवर पसरला होता. दाढी वाढली होती. केस अस्ताव्यस्त. तोंडात जळती चारमिनार. डोळे तारवटलेले.

मला शंका आली. काळजीच्या स्वरात मी विचारले, "काय रे तब्येत बरी नाही?"

"दोस्ता, तुलासुद्धा असंच वाटतं "?

'म्हणजे आणखी कोणाकोणाला वाटलं?"

"आमच्या सौ.ला. माझी ही अवस्था पाहिली आणि बाई सरळ माहेरी पळाली." त्याने खुलासा केला.

'काही विशेष?" मी चौकशी केली.

"विशेष काही नाही रे!" आणि माझ्या दोस्ताने वकऱ्यासारखी मान टाकली. तो चक्क लाजला. हळूच बोलला, "मी लेख—"

"लेक?" म्हणजे आनंदाची बातमी होती की!

"लेक नाही लेको, लेख—लेख तो उसळला.

"असं, असं!" माझ्या पोटात गोळा उभा राहिला. म्हणजे बाकीच्या प्राध्यापकांसारखा माझाही दोस्त 'इये मराठीचिये नगरी' दुकान टाकणार की काय? एका भल्या माणसाला मुकलो या विचाराने मी एक उसासा टाकला.

खरं म्हणजे तुझ्याचकडे येणार होतो." तो अजूनही लाजत होता. मान वर करून माझ्याकडे बघायला तयार नव्हता. "तू कुठल्याशा पेपरात सब-एडिटर का कोणीतरी आहेस ना रे?"

"बरं मग?" माझ्यातील सब-एडिटर बोलला. हा प्राणी घोड्यासारखाच सदा जागा असतो.

'मग काय? लेको आधी माझा हा लेख घेऊन जा आणि छापून आण." दोस्ताचे फर्मान सुटले.

अशा गोष्टीचा नाहीतरी मला सराव होताच. मी हसत म्हटले, "अरे पण वाचू-बिचू तरी देशील?"

'वाचून तुला कळणार आहे?" प्राध्यापकाने शंका घेतली. "तुलाच काय, तो समजू शकतील अशी फारच थोडी माणसं या देशात आहेत. इतक्या वरच्या पातळीवरून विचार करण्याची आपल्याला सवयच नाही. बौद्धिक दृष्ट्या, आपण सगळे पिग्मी आहोत "

असे बरेच काही तरी माझ्या प्राध्यापक मित्राने सुमारे एक तास मला सुनावले.

परिणाम—

त्याचा लेख मुकाट्याने खिशात टाकून मला उठावे लागले.

* *

मी नाही, आमच्या संपादकाने तो लेख वाचला. आणि परत केला. काहीच न बोलता.

मला वाईट वाटले. बहुतेक त्याच भरात मी तो वाचायला प्रवृत्त झालो

### आता हे एक मंडळ स्थापन करा

रुपयाचे व त्यामुळे नियोजनमंडळाचेही अवमूल्यन झाल्यापासून देशात महत्त्वाच्या इतक्या घटना घडू लागल्या आहेत की रेडिओ आणि वृत्तपत्रांमधून त्यांना मिळावी तितकी प्रसिद्धी मिळेनाशी झाली आहे. रेडिओ वा वृत्तपत्रे जाणूनबुजून ही गोष्ट करीत आहेत असे नाही. आज देशात पिकणाऱ्या एकूण महत्त्वाच्या बातम्या, काव्यशास्त्रविनोद व संगीत ऐकल्यावर बातम्यांकरिता रेडिओला मिळणारा निव्वळ वेळ आणि जाहिराती वजा जाता बातम्या छापण्याकरिता वृत्तपत्रात उरणारी मोकळी जागा या सगळ्या बाबींचा विचार करूनच आम्ही हे मत बनवले आहे. चालू घटनांचे जनतेला साकल्याने ज्ञान असणे हे जिवन्त लोकशाहीचे गमक आहे. याकरिता देशातील एकूण घडामोडींचे सुसूत्र व योजनाबद्ध संकलन व नियंत्रण करून प्रसिद्धीबाबत आज कित्येक घटनांवर जो अन्याय होत आहे तो टाळणे शक्य आहे. यासाठी एक घटना नियंत्रण मंडळ स्थापन करणे आजच्या परिस्थितीत अतिशय निकडीचे आहे.प्रस्तुत मंडळाचे अध्यक्षपद स्वतः पंतप्रधानांनी भूषविल्यास मंडळाला वजन येईल. उपाध्यक्ष व इतर सदस्यांची निवडसुद्धा त्यांनीच करावी. म्हणजे भ्रष्टाचाराबद्दल इतरांना जबाबदार धरता येणार नाही.

नियोजित घटना नियंत्रण मंडळाचे उद्दिष्ट स्पष्ट आहे. घटना—मग त्या राजकीय, आर्थिक, सामाजिक, मंत्रिमंडळासंबंधीच्या वगैरे—कशाही आणि कोणत्याही स्वरूपाच्या असोत, त्यांचे नियंत्रण करण्याची जबाबदारी एकट्या या मंडळाकडे सोपवली जाईल. देशात घडणाऱ्या घटना अटळ व अपरिहार्य असतात. समाजजीवनाचे ते अपरिवर्तनीय असे सूत्र आहे. ते तसे आहे म्हणून इतिहास घडतो, संस्कृती उभी होते. तेव्हा मुळातच घटनांचे निवारण करणे म्हणजे आपल्याच हाताने आपला इतिहास व संस्कृती यांवर आघात करण्यासारखे आहे, हे सूज्ञांस सांगणे नलगे! म्हणून सदर मंडळाला फक्त नियंत्रणाचे हक्कच असावेत. निवारणासंबंधीचे अधिकार त्याला देऊ नयेत. मंडळाकडून हक्कभंग वा अधिकाराचे अतिक्रमण होऊ नये म्हणून वेळोवेळी चौकशी समिती नेमून तपासणी करण्यात यावी.

घटना या शब्दाची व्याख्या, तिची व्याप्ती व कालमर्यादा एकदा निश्चित झाल्या की मग मंडळाचे कार्य अवघड नाही. परंतु, या तीन बाबींच्या अन्वयार्थावरच बहुधा लोकसभेत घटनात्मक पेचप्रसंग उद्भवण्याचा संभव आहे. माध्यमिक शिक्षणाच्या त्रिभाषिक सूत्रापेक्षाही हा फास विरोधी पक्षांना अधिक डावपेचाचा वाटण्याची शक्यता आहे. तेव्हा प्रत्येक पक्ष आपणाऐवजी तो इतरांच्या गळ्यात अडकावा म्हणून कसोशी करील. 'जे घडते ते' हा घटनेचा शब्दशः अर्थ घेतल्यास अर्धा अब्ज लोकवस्तीच्या या देशात घटना भगवंताच्या विराट स्वरूपाहूनही अफाट होण्याचा धोका आहे. आपले पुढारी हे ध्यानात येताच बहुधा आधीच भांबावतील. आणि कुटुंब नियोजनाऐवजी एकदम कुटुम्बनाशाचाच कार्यक्रम हाती घेण्याकरिता कालवा करतील. परंतु, त्यातही आत्मनाश आहे हे दिसून येताच मूग गिळून तडजोडीला तयार होतील.

तरीसुद्धा पंतप्रधानांनी विरोधी पक्षाशी एकदा या प्रश्नावर बोलणी करावयास हरकत नाही.कारण आपण तो एक उत्तम पायंडा पाडला आहे. काही निष्पन्न झाले नाही तरी चालेल, पण हा पायंडा राखलाच पाहिजे. नाहीतरी अखेर हुकमी बहुमताच्या जोरावर 'सार्वजनिक क्षेत्रात आठवडाभर जे सतत घडत रहाते तिला घटना म्हणावे' ही व्याख्या संमत व्हावयास हरकत नाही. आठवड्याची कालमर्यादा संयुक्त समाजवादी पक्षाला मान्य होणार नाही. मधु लिमये कडाडून तात्त्विक विरोध करतील. घटनांवर स्थळ, काळ, अर्थ वगैरे निर्बंध घालून घेणे म्हणजे राज्यघटनेने नागरिकाला मिळणाऱ्या हक्कांवर गदा आणण्यासारखे आहे, इत्यादी गोष्टींची ते रेकॉर्ड लावतील. जॉर्ज फर्नांडीस 'मुंबई बंद' पाडण्याची धमकी देतील. राजनारायण अन्नसत्याग्रहाचा संकल्प सोडतील. तिकडे लक्ष द्यावयाचे कारण नाही.

घटनेची कालमर्यादा एका आठवड्याची असावी असे संसदेने एकदा ठरविले की वर्षाच्या बावन्न आठवड्यात फक्त बावन्नच घटना घडू लागतील. त्या सतरा राज्ये व दहा केंद्रशासित प्रदेश यांच्यामध्ये लोकवस्तीच्या प्रमाणात वाटणे योग्य होईल. निरनिराळ्या राजकीय पक्षांमध्ये वाटप करताना निवडणूक मंडळाने मान्यता दिलेल्या राजकीय पक्षांचाच फक्त विचार केला जावा. तसेच गेल्या निवडणुकीत प्रत्येक पक्षाला मिळालेल्या मतदानाच्या प्रमाणात ही वाटणी व्हावी. म्हणजे कोणत्याच पक्षाला आपल्यावर अन्याय झाल्याची ओरड करता येणार नाही. वाटणीत कांग्रेस पक्षाला सिंहाचा वाटा मिळेल हे खरे! आणि बैलाचे बिरुद मिरवणाऱ्या पक्षाने सिंहाचा वाटा उचलावा हे उचितसुद्धा नाही. परंतु या गोष्टीला मतदानाचा हक्क बजावणारी प्रौढ जनता जबाबदार आहे. तेव्हा अधिक बोलण्याची सोयच नाही!

सरकारी कामकाजात आठवडा म्हणजे खरे सहाच दिवस—सोमवार ते शनिवार. तेव्हा रविवारी आणि इतर रजेच्या दिवशी कोणतीच घटना घडू दिली जाणार नाही याबद्दल घटना नियंत्रण मंडळाला जागरूक रहावे लागेल. लोकसभेचे अधिवेशन चालू असतानाही देशात इतर घडामोडी होणे मंडळाला सोयीचे नाही. कारण जनतेचे लोकसभेच्या कामकाजावरील लक्ष उडण्याचा संभव आहे.

इतकी वर्षे घटनांवर नियंत्रण नसल्याने राष्ट्रीय बळ, पैसा व काळ यांचा मोठ्या प्रमाणावर अपव्यय झाला असला पाहिजे यात शंका नाही. विशेषतः एकाच वेळी अनेक घडामोडी उसळल्या की एक नाही धड भाराभर चिंध्या अशी गत होते. उदाहरणार्थ: हरियाना व पश्चिम बंगालमध्ये मंत्रिमंडळे एकाच आठवड्यात

गडगडली. वाटले होते खूप काही होईल. प्रत्यक्षात फार थोडे घडले. कारण घटना एकमेकीच्या मुळावर आल्या, वेळ साधून आल्या. लोकमत, असलेच तर, द्विधा झाले. परिणामी दोन्ही घटना गर्भातच जिरल्या. उलट भाषिक दंगली किंवा गोवधबंदीची चळवळ. या एकाच वेळी न घडल्यामुळे याच देशात नाही तर परदेशातसुद्धा दिगन्त कीर्ती करून गेल्या.

तेव्हा मंडळाला या सर्व प्रश्नांचा साधकबाधक अभ्यास करावा लागेल. तो संपला की मग मंडळ एक कार्यक्रमपत्रिका तयार करील. पत्रिकेत पुढील वर्षीच्या घटनांच्या तारखा निश्चित केलेल्या असतील. अंदाजपत्रकाइतकी ती गुप्त ठेवावी लागेल. वृत्तपत्रांना माहिती मिळू नये म्हणून सक्त दक्षता घ्यावी लागेल. फक्त एकच आठवडा आधी संबंधित पक्षाला, 'अमुक अमुक आठवडा तुमचा आहे. करावयाचे ते करा'—असे गुप्तपणे कळविण्यात येईल. काही अपरिहार्य कारणामुळे एखादी घटना घडू शकली नाही तरी कागदोपत्री घडली असेच नमूद होईल व तिला रीतसर प्रसिद्धी दिली जाईल.

देवाजीच्या कृपेने पीकपाण्याच्या बाबतीत चालू साली देशात एकंदरीत सुकाळ झाल्यामुळे अन्नधान्याच्या आघाडीवर पुढील वर्षी सामसूम राहील असा अंदाज आहे. 'अन्नविभाग रद्द करा', 'शिधा वाढवून द्या' वगैरे तुरळक प्रचारी थाटाचे प्रकार होतील. घटना नियंत्रण मंडळाला त्यांची दखल घ्यायचे कारण नाही. आर्थिक क्षेत्रात मात्र जादा धमाल उडण्याची शक्यता आहे. किमती रोखण्याच्या सरकारी धोरणाला अखेर व्यापारी वर्गाचा आता पाठिंबा मिळाला आहे. तेव्हा त्या वरच्या पातळीवर तरी निश्चित रोखल्या जातील असे वाटते. या गोष्टीचे स्वागत करण्यासाठी खालच्या पातळीवरील जनता निदर्शने, घेराव, सत्याग्रह वगैरे लोकशाही मार्गांचा अवलंब करीलच. तेव्हा आर्थिक आघाडीवर एकूण बऱ्यापैकी वऱ्हाड माजेल.

तीच गोष्ट देशाच्या अंतर्गत परिस्थितीची. हिचा तर विचार देखील करायचे कारण नाही. वृत्तपत्रांच्या बातम्यांचे मथळे वाचले तरी पुढचा अंदाज घेणे मंडळाला कठीण जाऊ नये. दंगली करून



विद्यापीठे बंद पाडणे जोपर्यंत विद्यार्थ्यांना शक्य आहे, तोपर्यंत भाषिक प्रश्न सोडविण्याच्या नादाला शहाण्याने पडू नये. नाहीतरी विद्यार्थ्यांचा विरोध अमुक एका भाषेला असा नसतोच. त्यांना नको असतो अभ्यास. शिवाय खरे शिक्षण शाळा कॉलेजाऐवजी बाहेरच मिळते हे गौडबंगालही आज यांना उमगलेले दिसते.

राजकारण हा या देशातील सर्वात मोठा धंदा झाला आहे. सुमारे पन्नास टक्के लोकांचे पोट आणि हातपाय या एका धंद्यावर चालतात. वाढती लोकसंख्या व इतर धंद्यातील मंदी यांचा विचार करता तूर्त तरी राजकारणाला तेजीच रहाणार. शिवाय या धंद्यात शिक्षणाचा वा वयाची अट नाही. निदर्शने, अन्नसत्याग्रह, घेराव, दगडफेक, घोषणा देणे, गाड्या जाळणे, आगगाड्या बंद पाडणे यांपैकी निदान तीन चार चातुर्याच्या कळा अंगी असल्या की भागते. (पैकी अन्नसत्याग्रहाची सवय बहुतेकांना आहेच. रोजच घरात उपासमार होत असते) वास्तविक हे गुण माणसात जन्मत: असतात. शिक्षणापायी आपण विनाकारण त्याची वाट लावतो. माणसातील या स्वाभाविक गुणांना पूर्ण वाव देणाऱ्या राजकारणाचे तरुण पिढीला आकर्षण वाटावे यात आश्चर्य नाही. काही असेल ! एक मात्र खरे की राजकारणाइतकी घटनापूर्ण, रक्तमय व स्फोटक शक्ती या देशात दुसरी नाही. भारताला अणुबॉम्ब तयार करण्याची जरुरी वाटत नाही. यामागील रहस्य बहुधा हेच असावे. अणुबॉम्बपेक्षाही अधिक संहारक अशी शक्ती आपल्यापाशी आहे—आपले राजकारण ! तेव्हा राजकारण आणि देशात घडणाऱ्या घटना यांचा कार्यकारणभाव लक्षात घेऊन घटना नियंत्रण मंडळ अंतर्गत परिस्थितीसाठी विशेष तरतूद करील यात शंका नाही.

आता घटनांवर नियंत्रण घालताना मंडळाला काही नियम पाळावे लागतील. अ. भा. काँग्रेसचा ठराव काही असला तर एका आठवड्यात जास्तीत जास्त एकच बिगर काँग्रेसचे मंत्रिमंडळ उलथून पाडता येईल, असा नियम करणे इष्ट होईल. जातीय दंगली कोठेही, केव्हाही झाल्या तरी सगळ्यांना एकाच दिवशी प्रसिद्धी द्यावी लागेल. पोस्टाच्या खास स्टॅम्पवर तामीळ अक्षरे नाहीत या सबबीवर अण्णादुराईंनी ज्या दिवशी तो झिडकारला त्याच दिवशी ठाकरे यांच्या शिवसेनेची बातमी कितीही महत्त्वाची असली तरी प्रसिद्ध करता येणार नाही. जनसंघाने बिहारमधील उर्दूविरोधी चळवळ थांबविल्याखेरीज बलराज मधोकना काश्मिरी पंडितांच्या सहाय्यकाला श्रीनगरला धावता येणार नाही.

आंतरराष्ट्रीय क्षेत्रात एखादी महत्त्वाची घटना घडली तर पंतप्रधान, संरक्षणमंत्री व परराष्ट्र खात्याशी संपर्क असणारे एक दोन मंत्री परदेशी दौरा काढून या घटनेमुळे निर्माण झालेली जागतिक तंगी कमी करण्याचा प्रयत्न करतील. यांनी निरनिराळ्या राष्ट्रप्रमुखांबरोबर काढलेली संयुक्त निवेदने प्रसिद्ध होताच मंडळ या घटनेवर पडदा पाडील.

एखाद्या घटनेवर राजकीय पक्षांतर्फे कायकाय प्रतिक्रिया व्यक्त व्हाव्यात यासंबंधी मंडळाने एक आचारसंहिता तयार करावी. तीनुसार घटना राष्ट्रीय असो वा राज्यपातळीवरची असो; तिचे

स्वरूप सामाजिक, आर्थिक, राजकीय वा कोणतेही असो प्रत्येक पक्षाला फक्त एकच नवेदन प्रसिद्ध करता येईल. स्वतंत्र पक्षाला खास सवलत द्यावी लागेल. त्याला चार निवेदने प्रसिद्ध करण्यास हरकत नसावी. राजाजी स्वराज्यात लिहितील. एन्. जी. रंगा गुंटूरहून प्रतिक्रिया व्यक्त करतील. मिनू मसानी दिल्लीला एखाद्या चहापार्टीच्या प्रसंगाने वक्तव्य करतील व डाह्याभाई पटेल विमानतळावर वार्ताहरांशी बातचीत करताना मतप्रदर्शन करतील.

साधारणपणे ही निवेदने हिंदी किंवा इंग्रजीत प्रसिद्ध व्हावीत. राज्यघटनेने मान्यता दिलेल्या चौदा भाषात ती प्रसिद्ध करण्याचा अधिकार एकट्या 'संसोपा'ला राहील. तरीसुद्धा वृत्तपत्रांकडे या निवेदनाचे इंग्रजी भाषांतरच त्याला पाठवावे लागेल. निवेदनात इतर पक्षांवर टीका होणार नाही याची प्रत्येक राजकीय पक्षाला काळजी घ्यावी लागेल. याचा अर्थ असा की डाव्या पी. सुंदरय्यांना बंगालमधील अशुतोष व अतुल्य घोष यांच्या हातमिळवणीच्या संदर्भात भांडवलशाहीतील विसंवादावर थिसीस लिहिण्याची संधी मिळणार नाही. परंतु, नक्षलबारीच्या उठावात सूर्याजी पिसाळाची भूमिका घेतली म्हणून उजव्या ज्योती बसूंचा 'फेरसुधारणावाद' ते चव्हाट्यावर आणू शकतील.

जय घटना! घटना नियंत्रण मंडळ यशस्वी होवो!

* *

प्राध्यापक मित्राचा लेख वाचला आणि वातांच्या झपाट्यात 'उत्कृष्ट, अप्रतिम' असे काहीतरी वरळत मी संपादकाच्या खोलीकडे मोर्चा वळवला.

अग्रलेखाची वाहवा करीत बरीच मतलबी माणसे या खोलीत शिरत.

"या या!" अशांच्या स्वागतासाठीच संपादक या दोन शब्दांचा वापर करीत. आणि चेहऱ्यावरही आगळे हास्य फुलवीत.

गडबडीमुळे थोडा उशीर झाला खरा! पण मी हा मीच आहे ही गोष्ट संपादकाच्या दुसऱ्याच क्षणी ध्यानात आली. त्यांनी नेहमीसारखे तोंड वाकडे केले. कपाळावर आठचांच्याव रा खड्या गिरवल्या. आवाज हुकमी झाला, काय "काम आहे?"

"हा ल . . लेख म माझ्या दोस्ताचा . . ." मी वातातच होतो.

"असेल!"

"असेल काय? आहेच. आणि तो उ. उत्कृष्ट, अप्रतिम व . . . वगरे . . .

'शब्द उधळू नका. त्यांना मोल्याहून मोल असते.' संपादकीय सुभाषित अंगावर आले,. "तुमच्या दोस्ताचा लेख विनोदी वाटावा. परंतु —"

"विनोदी?" वाताताही माझी शुद्ध गेली नव्हती.

त्यांनी पृच्छा केली, "तुमचा हा दोस्त प्राध्यापक वगैरे आहे काय?"

"बुद्धिमान लोक प्राध्यापकच होणार. माझा दोस्त बुद्धिमान आहे."

"वाटलंच! लेख भाषांतरित आहे." संपादकांनी निकाल दिला. आम्ही नेहमीच प्रतिपादन करीत आलो आहोत की इंग्रजी भाषेच्या शिक्षणाने मराठी साहित्याचा ऱ्हास व्हावयाचे एक कारण म्हणजे प्राध्यापकवर्ग साहित्यात वाटमारी करू लागला

संपादकांची पल्लेदार प्रतिभा अग्रलेखाच्या अवलख वारूवर मांड टाकण्यासाठी अशी चूळबूळ करू लागलेली दिसताच त्यांच्या खोलीत अधिक थांबणे हिताचे नव्हते.

लेखाच्या गर्भपाताची हकीगत मी माझ्या प्राध्यापक दोस्ताला सांगितली.

त्याला दुःख वगैरे झाले नाही. आपल्याला भाषान्तऱ्या म्हटले याचीही त्याला खन्त वाटली नाही. का? तर म्हणे, ते भाषान्तरच होते. आणखी काय? तर म्हणे, वड्या बंडखोरांमध्ये ज्ञानेश्वर नामे जो पहिला होऊन गेला तो मराठीतील आद्य भाषांतरकार होय. लोकहितवादी, आगरकर, म्हटलेच तर आपले ह. ना. आपटे तसे 'भाषान्तऱ्ये'च होते म्हणे. तात्पर्य काय? तर म्हणे, ह्या सर्वांच्या यादीत बसण्याचा मान मिळाला तर ती भाग्याचीच गोष्ट आहे.

त्याचा लेख वाचल्यापासून आपल्याला काहीतरी समजू लागले आहे असा मला भ्रम झाला होता. त्याच्या ह्या भाषणाने तो साफ गेला. बरे झाले. डोकेदुखी गेली. पुन्हा जिवाला कसे हलके हलके वाटू लागले.

"तुझ्या संपादकांना माझा लेख विनोदी वाटला ना?" माझ्या प्राध्यापक दोस्ताने मध्येच मला छेडले.

"जाऊ दे रे! त्यांचे मत कां मनावर घेतोस?" मी म्हटले.

"मनावर घ्यायला हवे दोस्ता — मनावर घ्यायलाच हवे. बस्स ठरले! यापुढे आपण विनोदी लिहिणार! 'पुलं'नंतर कोण? सुम्हा मराठी वाचकवर्गाचा हा ज्वलन्त प्रश्न आता सुटला. मी सोडवला. 'पुलं'नंतर मी. मी मी

आणि माझा दोस्त मोठमोठ्याने हसू लागला. टाळ्या वाजवू लागला.

आणि 'मी मी' म्हणणाऱ्या त्याच्या त्या प्रचंड हशा व टाळ्या मोजण्याच्या उद्योगास मी लागलो.

• • •








# एक युवती



# एक चषक

—अमृता प्रीतम

अनु. प्रा. म. ळ. वराडपांडे

**....मी काही बोलण्याच्या आतच ती म्हणाली, "एक वचन दे मला. जोपर्यंत माझ्या हृदयाचा चषक रिता होणार नाही, तोपर्यंत तू दुसऱ्याला स्पर्श करणार नाहीस म्हणून!"**



प्रसिद्ध चित्रकार सुमेश नंदा यांची ही कथा खरं तर मी गेल्याच वर्षी लिहिली होती. दिल्लीत त्यांच्या चित्रांचं प्रदर्शन भरलं होतं गेल्या वर्षी. सतत आठवडाभर कुठल्यान् कुठल्या वृत्तपत्रात त्यांच्या कलाकृतींवर रकाने भरभरून समीक्षणात्मक लेख येत होते. खास जाणकार मंडळी त्यांच्या कलासौंदर्याची स्तुती करीत होते. एका अनभिज्ञ पण विलक्षण संवेदनशील मनाच्या व्यक्तीच्या ठायी कलेची जी जाण असावी तेवढीच मजजवळ होती. त्यांच्या चित्रातील रंग आणि रेषांच्या कलात्मक सौंदर्याचा मुग्ध होऊन आस्वाद घेत असताना त्यांच्या दोन चित्रांनी माझं लक्ष विशेष वेधून घेतलं होतं. एका चित्राखाली लिहिलं होतं 'अडीच पत्ती, दीड पत्ती' आणि दुसऱ्या चित्राखाली, 'एक युवती एक चषक.'

पहिले चित्र चहाच्या मळ्यात चहाची पत्ती खुडणाऱ्या पहाडी युवतीचं होतं. त्याचं स्पष्टीकरण चित्रकारानं असं दिलं होतं

चहाच्या झाडाच्या अगदी टोकावर दीड पानं असतात एक पूर्ण मोठं पान आणि त्याला लागून असलेलं एक छोटसं कोवळं पान. या दीड पानांचं तेज काही औरच असतं. या अंतिम पर्णाच्या खाली अडीच पानं उगवतात, अत्यंत मृदु . आणि त्याच्या खाली मोठ्या पानांनी युक्त असलेल्या अनेक शाखा. ही दीड पानं आणि अडीच पानं तोडून वेगळी ठेवतात या पानांचा जो चहा बनतो तो फार महाग विकला जातो. आपण चहा विकत घेतो तो या खालच्या मोठ्या पानांचा असतो. एका संपूर्ण झाडापासून जेमतेम चार छोटी पानं मिळतात. संपूर्ण मळ्यातून अशी कितीशी मिळणार? त्यांचा चहा फार महाग विकला जातो. ६० रु. पौंडाहूनही महाग.

सुमेश नंदांच्या या चित्रातील यवतीचा चेहरा अर्ध्याहूनही थोडा कमीच दृग्गोचर होत होता. प्रेक्षकांकडे मुख्यतः तिची पाठच होती पण तरीही तिचं सौंदर्य कसं उठावदारपणे दिसत होतं. वाटत होतं, सर्व पहाडी











अनुक्रमणिका

तरुणी म्हणजे जणू चहाचं झाड, विस्तृत पसरलेलं, आणि ही युवती म्हणजे जणु त्या झाडाच्या अग्रावर फुललेला लुसलुशीत कोंब छोटीशी हिरवीजर्द, तेजस्वी दीड पत्ती पण मी माझी प्रतिक्रिया चित्रकाराजवळ व्यक्त केली नाही.

आणि दुसरं चित्रं त्याखाली 'एक युवती : एक चषक' असे शब्द लिहिले होते एका पहाडी युवतीच्या आग-ळचाच सौंदर्याचा मुलायम आविष्कार होता तो ! विलक्षण बोलकं चित्र होतं ते. चित्रकारानं त्याचं काही स्पष्टीकरण दिलेलं नव्हतं. माझ्या तोंडून उत्स्फुर्तपणे निघून गेलं 'अशा सुदर चषकाचा आस्वाद घ्यायला एक संपूर्ण आयुष्यही कमीच आहे.'

चित्रकारानं चमकून माझ्याकडे पाहिलं. सुमारे साठ वर्षांचं वय असावं पण डोळे विलक्षण तरुण होते त्यांचे. ते हलकेच म्हणाले, 'अनेकांनी भाष्यं केली या कलाकृतीवर पण त्यातील नेमका भाव तुम्हीच हेरलात. हेच हेच सांगायचं होतं मला. कित्येकानी माझी थट्टा केली, 'एक युवती : एक चषक' आणि चषक नित्यनूतन असतो.

न जाणे त्या चित्रात कोणतं आकर्षण होतं ! एक आठवडाभर ते प्रदर्शन चालू होतं आणि त्या दरम्यान मी तीनदा तेथे गेले होते. खरं म्हणजे त्या चित्राच्या आकर्षणानं कलेची एक मर्मज्ञ म्हणून नव्हे तर केवळ अंतःप्रेरणेनं मी सुमेश नंदांच्या त्या कलाकृतीबद्दल एक साधंसं वाक्य बोलून गेले. आणि त्या साध्याशा वाक्यानं चित्रकाराचं संपूर्ण अस्तित्व हेलावून गेलं होते. त्याचं अंतरंग त्याच्या ओठावाटे व्यक्त झालं. कुठली तरी तार नकळत छेडली गेली होती, त्याचाच तो जणु मर्मध्वनी होता.

कांगडा स्टाईलचा अभ्यास करायला मी कांगडातील एका गावी काही दिवस राहीलो होतो. पालमपूर चहाच्या मळ्यापासून फारसं दूर नव्हतं. हे चित्र, 'दीड पत्ती, अडीच पत्ती', मी तिथेच रेखाटलं होतं. आता नीट पहा, यात या बाजूला जी युवती उभी आहे . . . हं तीच . . . तीच या दुसऱ्याही चित्रात आहे. आलं लक्षात ?'

'तुम्ही सांगण्यापूर्वीच हे ओळखलं होतं मी. पहिल्याच दिवशी हे चित्र पाहून मला असं वाटलं होतं की या सर्व पहाडी तरुणी जणु चहाचं झाड, विस्तृत पसरलेलं, आणि ही युवती म्हणजे जणु त्या झाडाच्या अग्रावर फुललेला लुसलशीत कोंब छोटीशी हिरवीगार, तेजस्वी दीड पत्ती. वृद्ध सुमेश नंदांच्या डोळ्यात तारुण्याची लकाकी आली. ते म्हणाले, 'तुम्ही या चित्रांतील भाव नेमका ओळखला; यामागील कहाणी ऐकण्याचा अधिकार तुम्हाला आहे यापूर्वी ही गोष्ट मी कोणालाच सांगितली नव्हती.

'या मलीला मी टुणी म्हणत असे. तिचं नांव विचारायचेसुद्धा कष्ट मी घेतले नाहीत. तिनंच या दीड पत्ती, अडीच पत्तीचं रहस्य मला सांगितलं होतं आणि मी तिला म्हणालो होतो 'तूही तर मुलींच्या या झाडाच्या टोकावरील पत्ती आहेस. फार महाग न जाणे या चहाचा आस्वाद कोण घेईल !'

पावसाळ्याचे दिवस होते. एका नाल्याला असा पूर आला की शेजारच्या गावांना जोडणारी सडक त्याखाली बुडून गेली. येणं-जाणं बंद झालं. तीन दिवसांनंतर कुठं सडक दिसायला लागली. मी त्यावरून जात असताना टुणी समोरून येत असलेली दिसली. मी तिला म्हणालो, 'शेवटी थांबलं एकदाचं पाणी. असं वाटत होतं जणु हा पूर ओसणारच नाही कधी.'

माहीत आहे टुणी काय म्हणाली ते ? म्हणाली, 'बाबू, हे माणसाचे अश्रू आहेत कधी न ओसरायला !' मी टुणीच्या तोंडाकडेच पहात राहीलो. तिचं मुख सुंदर होतं. पण ते असंही काही बोलू शकत होतं अशी कल्पनाही केली नव्हती मी. अशा आशयाचं वाक्य मी कुठल्यातरी बंगाली कादंबरीत वाचलं होतं. पण टुणीनं कधी बंगाली कादंबऱ्या वाचलेल्या नव्हत्या पण जगातील सर्व देशातील दुःखाची भाषा बहुतेक एकच असावी.

मी तिच्या घरी गेलो. तिला आई होती, वडील होते, दोन भाऊ होते आणि एक भावजय होती. मी तिच्या घराचा अंतर्बाह्य अदमास घेऊ लागलो. तिच्या मनात कोणतं दुःख होतं ज्यात रुजून तो उद्गार वर आला होता. आणि मी तिच्या दुःखाचं मूळ शोधून काढलं एक दिवस. तिच्या वडीलांच्या शिरावर कर्जाचा डोंगर होता. त्यांच्यात मुलींना मूल्य येते. तीन चारशे पासून हजारापर्यंत. कर्ज देणाऱ्यानं टुणीला १५०० रुपयांच्या मोबदल्यात मागितली होती. टुणी म्हणायची, 'तो माणूस नाही, एक राक्षस आहे. स्वप्नात देखील भीती वाटते मला त्याची.'

एक दिवस टुणीला एकटं गाठून विचारलं, 'मी तुझ्या भीतीची बंधनं तोडली तर ?'

'पण कशी ?'

'मी तुला पंधराशे रुपये देतो. तू आपल्या बापूंना सांग लग्न मोडायला.'

कोणी एखादी दुसरी मुलगी असती तर कृतज्ञतेनं तिनं माझ्या पायाला स्पर्श केला असता, पण टुणीने सरळ माझ्या काळजालाच हात घातला. म्हणायला लागली, 'आणि मग तू माझ्याशी लग्न करशील ?'

कधी मी म्हटलं होतं, 'टुणी तू चहाच्या झाडाची सर्वात मूल्यवान पत्ती आहेस, हा चहा कोण पिईल ?' आणि आज टुणीने आपल्या प्राणांच्या पत्तीनं माझ्याकरता चहा बनवला होता. पण या गोष्टीचा विचारही माझ्या मनात आला नव्हता आणि मी तसं काही बोललोही नव्हतो. माझ्या म्हणण्याचा अर्थ असा नव्हता हे तिला समजावून सांगण्याचा प्रयत्न केला मी, पण त्यानं जणू तिच्या वस्त्रांवर आगीची ठिणगी पडली.

म्हणायला लागली, 'अरे बाबू ! मी एखादी भिकारीण आहे की काय ?'

माझं आयुष्य काही चांगलं गेलेलं नव्हतं. किती मुली आल्या होत्या आणि आल्या रस्त्यानं गेल्या होत्या. क्षणभरच त्यांना साथ-सोबत देऊ शकलो होतो मी आणि जीवनाचा हा संपूर्ण प्रवास कोणा एका व्यक्तीच्या सोबतीनं मी करू शकेन याबरचा



## ‘जोगिया’

फक्त एकदाच येऊन जा--
एकदाच येऊन जा आणि–
स्मृतिगंधात भिजलेली
भावफुले मज अर्पिलेली
तुझी तू घेऊन जा
फक्त एकदाच येऊन जा–॥
अशीच एकदा आली होतीस
नाजनखरे ठेऊन गेलीस
साध्याभोळ्या मनात माझ्या
नाव आपले कोरुन गेलीस–
कोरलेल्या जखमेतून
पाझरणाऱ्या वेदनेस
स्निग्धस्पर्शी निश्वासांचे
दान तू देऊन जा
फक्त एकदाच येऊन जा–॥
अशीच एकदा आलीस अन्
फिरवून गेलीस अंगभर
तुझा स्पर्श मोरपिशी
उधळून गेलीस घरभर
मुक्त स्वरांचे माणिकमोती
सांडलेले सारे धन
तुझे तू घेऊन जा
फक्त एकदाच येऊन जा–॥
अशीच एकदा आलीस अन्
गिरकी घेतलीस समेवर
चैतन्याच्या झंकाराचा
विसरुन गेलीस एक पैंजण
रुणझुणत्या ज्याच्या स्वरात
बोलत असते अबोल प्रीत–॥
मी तर आता जोगी फक्त–॥
जोग्याच्या या पर्णकुटीत
कशास हवेत अलंकार
तुझे तू घेऊन जा–॥
फक्त एकदाच येऊन जा–॥

–कु. शकुंतला रोकडे

माझा विश्वासच उडाल्यासारखा झाला होता.

‘खूप तृष्णा आहे माझ्या जीवनात टुणी. तू हे प्राशू शकणार नाहीस. तोंड भाजेल तुझं’, आणि प्रेमानं टुणीचं मन राखायला मी हलकेच तिच्या ओठाला बोटांनी स्पर्श केला.

‘फंकून फंकून पिईन, बाबू.’

हे शब्द उच्चारताना मी तिला पाहिलं आणि त्याक्षणी मला उमगलं जिच्याबरोबर मी जीवनाचा प्रवास करू शकेन अशी जर कोणी युवती असेल तर ती हीच आणि हीच आहे. . . .’

पण चांदीच्या रुपयासारखा मला माझा निर्णय ठणकावून पारखायचा होता. मी तिला म्हणालो, ‘तुला माहीत नाही टुणी, पूर्वी माझ्या आयुष्यात किती मुली येऊन गेल्या ते. प्रत्येक मुलीचा आस्वाद मी मद्याच्या चषकासारखा घेतला . . आणि मग एका चषकानंतर दुसरा

टुणी हसली, ‘का बाबू, तुझी तृष्णा नाही भागत ?’

यावर मी काही बोलण्याच्या आधीच ती पुढे म्हणाली, ‘एक वचन दे मला. जोपर्यंत माझ्या हृदयाचा चषक रिता होणार नाही तोपर्यंत तू दुसऱ्याला स्पर्श करणार नाही म्हणून.’

मला वाटलं आजपर्यंत मी ज्या चषकांचा आस्वाद घेतला ते फक्त देहाचे चषक होते. फक्त देहाचे. त्यात हृदयाचा चषक एकही नव्हता. जर असता तर तो रिता होईतो मी दुसऱ्याला ओष्ठस्पर्श करू शकलो नसतो आणि बहुतेक हृदयाच्या चषकातील मदिरा कधीच रिक्त होत नसते

मी माझ्या निर्णयाचं नाणं वाजवून पाहिलं. टुणीचा निर्णय तर ‘खरा’ होताच. तिच्या आई वडिलांनी देखील आम्हा दोघांचा निर्णय मान्य केला आणि मी पैश्याचा प्रबंध करायला शहरात आलो...’

सुमेश नंदानं आपली कथा सांगायला सुरुवात केली होती तेव्हा आठ वाजत आले होते. आठ वाजता प्रदर्शन संपल होतं म्हणून हॉलमध्ये कोणी लोक उरले नव्हते. अर्थात यावेळी येणारंही कोणी नव्हतं. कथा संपली नव्हती. पण येथपर्यंत आल्यावर चित्रकार कथेला तसेच सोडून मौन समाधीत मग्न झाले.

मी त्यांच्याकडे पहात राहीले. अपुऱ्या कथेकडे पहात राहीले

चपराशी प्रदर्शनाचा हॉल बंद करण्यासाठी उंबरठ्यापर्यंत आला होता पण मी त्याला थांबण्याची खूण केली आणि थांबलेली कथा चालू लागण्याची वाट पाहू लागले . . . मूकपणे.

चित्रकाराच्या बंद डोळ्यातून आसवं ओघळायला लागली. त्याबरोबर कथेचा अवरुद्ध प्रवाहही वाहू लागला.

‘मी पैसे घेऊन परतलो पण नियतीनं माझ्या हातातील चषक हिसकावून घेतला होता.’

‘टुणीच्या वडिलांनी जबरदस्तीनं तिचा विवाह लावला होता ?’ विचारताना माझे ओठ थरथरत होते.

त्यापेक्षाही भयंकर. टुणी ज्याला राक्षस म्हणत होती त्या म्हाताऱ्या सावकाराने कोणाच्या तरी हस्ते टुणीवर विषप्रयोग केला होता, आपल्या सौद्याची वाताहत झाल्याचा सूड म्हणून

टुणीच्या चितेत थोडी धुगधुगी बाकी होती मी त्या अग्नीला साक्ष ठेवून चितेच्या भोवती सप्तपदी केली

बहुतेक तेव्हा चित्रकाराचं वय तीस-पस्तीस वर्षांचं असावं आणि पुढील तीस वर्षं त्यांनी त्या सप्तपदीचं पावित्र्य राखलं असावं. हे त्यांचं ६०-६२ वर्षांचं वयच सांगत होतं. विचारण्याची गरजच नव्हती. मला वाटलं संपूर्ण विसावं शतक त्याच्यापुढे नतमस्तक झालं आहे.

हलकेच चित्रकाराचे ओठ हालले. टुणी म्हणाली होती, ‘एक वचन दे मला. जोपर्यंत

माझ्या हृदयाचा चषक रिता होणार नाही तोपर्यंत दुसऱ्याला स्पर्श करणार नाही, समोर उभी असलेली टुणी साक्ष आहे, मी कुठल्याही दुसऱ्या चषकाला स्पर्श केला नाही.

समोर टुणीचं चित्र होतं. टुणी, एक युवती एक चषक मृत्यूनं चित्रकाराच्या हातातील चषक हिसकावून घेतला होता पण त्याच्या कल्पनेतील तो चषक हिसकावू शकला नाही. त्याच्या हातातील शक्ती अपुरी पडली होती आणि चित्रकाराचं सर्व आयुष्य पोत पोत गेलं पण त्या चषकातील मद्य कधीच रिक्त झालं नाही

* *

त्यांच्या मुखातून ही कथा ऐकून जवळपास एक वर्ष झालं आहे. कथा ऐकल्यावर लगेच मी ती लिहून काढली, पण ती छापायची परवानगी त्यांनी मला दिली नव्हती. तेव्हा मी कथेचं त्यांचं खरं नाव लिहिलं नव्हतं. ते म्हणाले होते, 'जोपर्यंत माझ्या जीवनाचा अंतिम दिवस येत नाही तोपर्यंत माझ्या निष्ठेबद्दल ठाम कसं सांगता येईल? हा चषक पीत मला आयुष्याचा शेवटचा क्षण संपवू द्या. मग ही कथा छापा, तोपर्यंत नाही. आणि तेव्हा, माझं खरं नावही द्यायला हरकत नाही....

आणि आता, अलिकडेच आपण वृत्तांपत्रात वाचलं असेल की सुप्रसिद्ध चित्रकार सुमेश नंदा हे निधन पावले. त्यांच्या कलेविषयी अनेक रकाने भरले होते आणि एका वृत्तपत्रात तर हेही लिहिलं होतं की ज्या खोलीत चित्रकारानं आपली जीवनयात्रा संपवली त्या खोलीत त्यांनी काढलेले फक्त एकच चित्र लावलेले होते, 'एक युवती : एक चषक.'

आयुष्य लहान होतं आणि चषक मोठा... आज चित्रकाराची निष्ठा अस्सल ठरली आहे. या कथेत मी आज काहीच बदललेलं नाही फक्त त्यांचं खरं नांव लिहिलं आहे, त्यांच्याच म्हणण्यानुसार.

● ● ●












# संकट सुंदरीला मदत

*...स्त्रीदाक्षिण्य दाखवायचे ते काहीतरी लाभ व्हावा म्हणूनच ना? रंगनाथाच्या या प्रश्नाचे उत्तर रंगवूनच मिळाले म्हणून तर हा कथाप्रपंच...*

"संकटात सापडलेल्या सुंदरीला कधीही मदत करू नये" —रंगनाथ.

वरील तत्व रंगनाथने सांगितले आहे हे वाचून तुम्हाला आश्चर्य वाटले आहे हे तुमच्या चेहऱ्यावरून स्पष्ट दिसत आहे. कारण पूर्वी रंगनाथचे तत्व वेगळे होते हे तुम्हाला माहीतच आहे.

"संकटात सापडलेल्या सुंदरीला तर मदत करावीच, पण संकटात न सापडलेल्या सुंदरीलाही मदत करावी" असे रंगनाथचे पूर्वीचे तत्वज्ञान होते. त्या तत्वज्ञानात आता बदल झाला आहे. पूर्वी रंगनाथ संधि मिळेल तिथे स्त्रीदाक्षिण्य दाखवीत असे. बसमध्ये तो बसला असता मधल्या स्टॉपवर जर एखादी मुलगी बसमध्ये चढली तर तावडतोब उठून आपली जागा तो तिला देऊ करी. पण ती मुलगी त्या जागेवर न बसता ती जागा मागे उभ्या असलेल्या म्हातारीला देई, हे वेगळे. थिएटरमध्ये तो आपल्या शेजारची खुर्ची एखाद्या सुंदरीला देऊ करी पण ती मुलगी त्याच्याजवळ न बसता पलीकडे मवाली वाटणाऱ्या व भडक कपडे घालणाऱ्या माणसाशेजारी खुशाल बसे. रंगनाथ स्वतः होऊन एखाद्या मुलीशेजारच्या खुर्चीवर बसला तर ती तावडतोब उठून दुसऱ्या खुर्चीवर जाऊन बसे. पण रंगनाथ स्त्रीदाक्षिण्य दाखविण्याची संधि सोडत नसे. ते आपले कर्तव्य आहे असे तो मानीत अहे. व ते पाळण्यात तो कसूर करीत नसे.

पण आता सुंदरीला मदत करण्याचे तर राहू द्या, पण एखादी सुंदरी रस्त्याच्या एका कडेने येताना दिसली तर तो ती कड सोडून दुसऱ्या कडेने जाऊ लागे. अर्थात् हा बदल सहजासहजी झालेला नाही. त्यामागे फार मोठा इतिहास आहे.

पंडित क्षीरसागर

त्या दिवशी रंगनाथ जंगली महाराज रस्त्याने सहज फिरायला चालला होता. रस्त्याने रंगीबेरंगी साड्यांचे इंद्रधनुष्य दिसत होतें. वेगवेगळे सुगंध जाणवत होते. निष्ठेने यज्ञकर्म करावे तसे तो पोरींचे चेहरे न्याहाळीत चालला होता. इतक्यात त्याला एका ठिकाणी गर्दी दिसली. त्याबरोबर तो तावडतोब गर्दीत घुसला. या बाबतीत त्याचे धोरण प्रिन्स बिस्मार्कसारखे होते. बिस्मार्कला कोणत्याही गोष्टीचे व घटनेचे मूळ कारण समजल्याखेरीज चैन पडत नसे. तसेच रंगनाथचेही होते. म्हणून तो गर्दीचे कारण शोधण्यासाठी गर्दीत शिरला. आतमध्ये एक सुंदर मुलगी व एक मवाल्यासारखा दिसणारा तरुण होता. व त्या दोघाभोवती जादूगार अगर गारुडी आपले खेळ करून दाखवतो आहे अशा पद्धतीने लोक कडे करून उभे होते. आत शिरल्याबरोबर रंगनाथने प्रश्न केला, "काय झालं?" गर्दीतला एकजण म्हणाला, "या बाई म्हणतात या माणसानं माझा विनयभंग केला."

"म्हणजे काय केलं?"

"आता ते या बाईला आणि या बाबाला माहीत!"

'मी सांगतो." १४।१५ वर्षाचा एक शाळकरी मुलगा म्हणाला "विनयभंग लेखकांना माहीत असतो. लेखकांच्या गोष्टी व कादंबऱ्यात तो नेहमी घडतो." हा पोरगा पुढे नक्की लेखक होणार असे रंगनाथ मनात म्हणाला. मग त्या मुलीला त्याने विचारले "काय हो हे खरं आहे का ?"

"होय हो. या मनुष्यानं मला धक्का मारला." ती म्हणाली. रंगनाथने त्या माणसाला विचारले, "काय हो हे खरं आहे का ?"

तो माणूस म्हणाला, "नाही. हे खोटं आहे. मी मुळीच या बाईला धक्का मारला नाही. आणि धक्का लागलाच असेल तर तो चुकूनच लागला असणार."

रंगनाथने विचारले, "धक्का—विशेषतः एका स्त्रीला—चुकून कधी लागतो काय ?"

"हो. न लागायला काय झालं ? हा केवढा गर्दीचा रस्ता आहे. गर्दीत धक्का लागणारच ! त्यात एवढं विशेष काय आहे ?"

ती मुलगी म्हणाली, "हा खोटं बोलतो. हा मनुष्य रोज माझा पाठलाग करतो. कॉलेजात जाताना, लायब्ररीत जाताना कधीही पहावे तो माझ्यापाठीमागेच असतो. बरेच दिवस मी हे सहन केलं. म्हटलं, जोपर्यंत आपल्याला प्रत्यक्ष उपसर्ग होत नाही, तोपर्यंत आपण तिकडे लक्ष देऊ नये हे उत्तम. पण आज याने मुद्दाम धक्का मारला."

आता तो मनुष्य चिडलेला दिसला. त्याने खिशातून रामपुरी मोठा चाकू काढला. बटन खटकन् दाबल्याबरोबर लांबलचक धारदार पाते बाहेर आले. त्या चाकूने नखे काढीत तो निष्काळजीपणे म्हणाला, "बरं मी मुद्दाम धक्का दिला. आता यावर कोणाचं काय म्हणणं आहे ?"

हा माणूस तर अगदीच मवाली दिसत होता. त्याने चाकूचे पाते बाहेर काढल्याबरोबर गर्दी दचकली. ती मुलगीही घाबरली. रंगनाथही घाबरला. आता त्या माणसाबरोबर काही बोलणे म्हणजे पायावर धोंडा पाडून घेण्यासारखे होते. ती मुलगी म्हणाली, "मी जाते. मला जाऊ द्या." "कुठं जातेस ?" त्या माणसाने तिचा दंड धरून मागे खेचले. व म्हटले, "मी धक्का मारला ना ? मग या गोष्टीचा फैसला होऊन जाऊ दे."

त्या माणसाने मुलीचा दंड धरल्याबरोबर रंगनाथचे पित्त खवळले. रंगनाथचे हे नेहमी असे होते. तो भावनाप्रधान असल्याने त्याचा मनावरचा काबू चटकन् सुटत असे. तो त्या माणसाला म्हणाला, "मिस्टर, तिचा हात सोडा आणि पोलीस चौकीवर चला. तिथंच फैसला करू." त्या माणसाने झुरळाकडे पहावे तशा तुच्छतेने रंगनाथकडे पाहिले व म्हटले, "मिस्टर मी तर पोलिसाकडे येत नाही. पण या पोरीलाही येऊ देणार नाही. तुम्हाला जायचं असलं तर जा माझी काही हरकत नाही."

"हो जाऊ." रंगनाथ म्हणाला, "पण आम्ही तुम्हा दोघाना घेऊन जाणार आहोत."

"अबे जा बे." तो माणूस म्हणाला. मराठीपेक्षा हिंदीत तुच्छता चांगली दाखवता येते. रंगनाथ पुढे होऊन म्हणाला, "तिचा हात सोड."

"नाही सोडणार."

रंगनाथने पुढे होऊन त्याच्या हाताला झटका देऊन तिचा हात सोडविण्याचा प्रयत्न केला. त्याबरोबर त्या माणसाने रंगनाथवर चाकू उगारला. रंगनाथ सावध होताच. त्याने बाजूला होऊन वार चुकवला. आणि येथेच गर्दीच्या मानसशास्त्राने उचल खाल्ली. गर्दी साधारणतः निष्क्रिय असते. पण तिला नेतृत्व लाभले की ती आपली शक्ती दाखवते, रौद्र स्वरूप दाखवते. त्या माणसापुढे रंगनाथ अगदीच किरकोळ दिसत होता. पण त्याने मोठे मनोधैर्य दाखवले होते. ते पाहून गर्दीलाही स्फुरण चढले. व एकदम सर्व लोक त्या माणसावर तुटून पडले. एकाने त्याच्या हातातला चाकू हिसकावून घेतला. दुसऱ्याने त्याला बडवण्यास सुरुवात केली. एकदम सर्व लोक आपल्या अंगावर धावून आल्यामुळे तो माणूस प्रथम चकित झाला. नंतर घाबरला. त्याला या घटनेची अपेक्षा नव्हती. आता येथे थांबलो तर आपली धडगत नाही हे त्याने ओळखले व तेथून पोबारा केला.

मग रंगनाथ त्या मुलीला म्हणाला, "तुम्ही घाबरू नका. आता तो तुम्हाला त्रास देणार नाही. मी तुमच्याबरोबर घरापर्यंत सोबत येऊ का ?"

"नको. मी जाईन." असे म्हणून रस्त्याने जाणारी एक रिक्षा तिने थांबवली व त्यात बसून ती निघून गेली.

रंगनाथला आश्चर्य वाटलं. एवढ्या मोठ्या संकटातून आपण तिला सोडवले. पण तिने आपले साधे आभारही मानले नाहीत. ही काय रीत झाली त्याला तिचा राग आला. पण नंतर त्याला वाटले की ती बरीच घाबरली होती. म्हणून आभार मानण्याचे तिला सुचले नसेल. म्हणून आपण रागवण्याचे काय कारण ? पण तिला मदत केल्यासरशी एक गोष्ट मात्र चांगली झाली. आता तिची ओळख वाढविण्याची संधि मिळेल. आता दिसेल त्या पोरीचे चेहरे न्याहाळण्याची जरूरी नाही. आता आपण फ्रॉम जनरल टू पर्टिक्युलर या स्टेजला आलो. आता याच पोरीवर मेहनत घ्यायची. या विचाराने त्याला आनंद झाला. रोज खानावळीतल्या जेवणाला शिव्या देण्याचा त्याचा प्रघात होता. पण त्या दिवशी जेवणाला नावे न ठेवता तो मुकाट्याने पुढे आलेले पदार्थ खात होता. या गोष्टीचे खानावळवाल्याला इतके आश्चर्य व आनंद वाटला की त्याने स्वतः होऊन चार्ज न घेता

एक पाणी कम दह्याची वाटी त्याला जादा दिली.

दुसऱ्या दिवसापासून रंगनाथ त्या मुलीच्या शोधार्थ हिंडू लागला. खरे म्हणजे तो त्याच दिवशी तिचा पत्ता विचारणार होता. पण ती लगेच रिक्षात बसून गेली म्हणून त्याचा नाईलाज झाला होता. आठ दहा दिवस झाले तरी ती त्याच्या नजरेस पडली नाही. त्याने जंगली महाराज रोड, फर्ग्युसन रोड, लक्ष्मी रोड, टिळक रोड पालथे घातले. निरनिराळ्या शोच्या वेळी निरनिराळी थिएटरे धुंडाळली. पण ती त्याला कुठेच दिसली नाही. त्याला आश्चर्य वाटले. ही कुठे हवेत तर विरून गेली नाही ना? मग त्याच्या नशिबाने ती त्याला जिमखाना पोस्टात दिसली. तो कार्डे घेण्यास पोस्टात गेला होता. रांगेमध्ये ती पुढे उभी होती. कार्ड पाकिटे घेऊन ती निघाली. तिच्या मागोमाग रंगनाथही निघाला. कार्डे घेण्याचे त्याने रद्द केले. न जाणो तेवढ्यात ती नाहीशी व्हायची. बाहेर रस्त्यावर आल्यावर त्याने तिला गाठले व म्हटले, "काय ओळख आहे का?"

तिने चमकून मागे पाहिले. मग म्हटले, "आहे ना? परवा आपण मदत केली. त्याबद्दल आभार." दोघे बराच वेळ चालत राहिले. ती काहीच बोलत नव्हती. आणि काय बोलावे हा रंगनाथलाही प्रश्न पडला होता. शेवटी मोठ्या धैर्याने त्याने विचारले, "कोपऱ्यावरच्या रेस्टॉरंटमध्ये आपण कॉफी घेऊ या का?

ती म्हणाली, "नको."

"नको काय? चला."

"नको नको."

"पण मला कॉफी घ्यावीशी वाटते. चला."

"मग तुम्ही घ्या. मी नाही येत. मला उशीर होतो."

"चला हो. किती आढेवेढे घेता. फार वेळ नाही लागणार."

"नको नको. मी जाते."

आणि तिने रस्त्यावरून जाणारी रिक्षा थांबवली व ती तीत बसून गेली. रंगनाथ थक्कच झाला. काय म्हणावे या मुलीला? उपकारकर्त्याचे एवढेही ऐकत नाही म्हणजे काय? काय मी तिला खात होतो? आणि तिचा पत्ता विचारायचा राहूनच गेला. एक संधि गेली. अशा मुलीशी कसं जुळवायचं बुवा! मोठा प्रश्नच आहे!

हा प्रसंग त्याने आपला मित्र शंभूनाथ याला सांगितला तेव्हा तो म्हणाला, "मार गोळी! तिला जर तुझी एवढी पर्वा नाही तर तू कां उगीच तिच्यासाठी झुरतोस? गेली उडत!"

"नाही रे नाही. शंभ्या असं म्हणू नकोस! फार गोड पोरगी आहे रे!"

"असेल असेल. नाही कोण म्हणतंय? पण ती जर तुझ्याशी बोलायला घाबरते, तुझ्याबरोबर कॉफी प्यायलाही येत नाही तर मग तू काय करणार आहेस रंग्या?"

"काय करू तूच सांग. मला काही सुचत नाही."

"हे बघ रंग्या. तिला जर तसं काही वाटत असतं तर ती तुझ्याशी नीट बोलली असती. तुझ्याबरोबर कॉफी प्यायला आली असती. पण तिनं तसं केलं नाही म्हणजे तिच्या मनात तसं काही नाही. तेव्हा तिचा नाद तू सोडावास हे बरं."

"शंभ्या तिचा नाद कसा सोडू रे! सारखा तिचा ध्यास लागला आहे. रात्री स्वप्नातही ती येते रे! ती माझ्या मनात भरून राहिली आहे रे."

"रंग्या मजनूसारखा विव्हळू नकोस. ती नाही तर नाही. तिच्यासारख्या छप्पन पोरी मिळतील."

"छप्पन कुठल्या मिळायला? कॉलेजसाठी पुण्यात येऊन दोन वर्षे झाली मला, पण एका तरी पोरीनं ढुंकून माझ्याकडं पाहिलं असलं तर शपथ? साधी झाडूवालीही माझ्याकडं बघत नाही. मोठ्या मुष्किलीनं हा मोका आला आहे, तर ही पोरगी शांतपणं बोलायलाही तयार नाही."

रंग्या तुला माझं ऐकायचं असेल तर मी तुला सल्ला देतो. जर ती मुलगी तुझ्याशी नीट बोलायलाही तयार नाही तर तू आपला तिचा नाद सोड कसा? उगाच संकटात सापडशील."

"हे आपलं तुझं काही तरीच. तिला चांगली बोलती करीन तरच नावाचा रंगनाथ!"

मग तुझं आपलं तू पहा. पुन्हा या विषयावर बोलणं बंद."

"ठीक आहे." रंगनाथ म्हणाला.


**आला आला पावसाळा आला !**

**तेलंगणात आगीचा पाऊस !**




महाराष्ट्र शासनाच्या प्रसिद्धी संचालकांतर्फे प्रकाशित



अनुक्रमणिका








दुसऱ्या दिवसापासून तिचा शोध घेण्याची मोहीम रंगनाथने पुन्हा सुरू केली. सात आठ दिवस ती त्याला दिसली नाही. पण रंगनाथ हार मानणारा नव्हता. प्रेयसीसाठी मजनू उपाशी रहात असे, फरहादने खडकांचा डोंगर फोडला, मग आपल्याला तिचा शोध काढण्याचेही जमणार नाही हे त्याला पटत नव्हते. उत्तर ध्रुव शोधायला गेलेले संशोधकही मागे पडतील अशा रीतीने त्याचे तिला शोधण्याचे प्रयत्न चालू होते. एक ना एक दिवस आपल्या प्रयत्नांना यश येणार हे तो ओळखून होता. आणि खरोखरच एक दिवस ती त्याला दिसली. एका थिएटरमध्ये ती सिनेमाचे तिकीट काढीत होती. लागलीच रंगनाथही तिच्या मागे उभा राहिला व त्यानेही तिकीट काढले.नंबरप्रमाणे त्याना शेजारच्या शेजारच्या खुर्च्या मिळाल्या. तिच्या मागोमाग तो तिच्या शेजारी खुर्चीवर आपण अगदी सहज आलो असे दाखवीत वसला. तिच्याकडे पाठ करून तो आजूबाजूला पहात राहिला. नंतर तिच्या बाजूकडे दृष्टि टाकून चेहऱ्यावर आश्चर्याचा भाव दाखवीत त्याने म्हटले, "अरे वा ! तुम्ही ! अलभ्य लाभ !"

तिने त्याच्याकडे पाहिले व म्हटले, "ठीक आहे."

तो चाटच पडला. आपल्या प्रश्नाचे एवढ्या थंडपणाने उत्तर येईल अशी त्याची अपेक्षा नव्हती. मग बळंच बोलणे चालू रहाण्यासाठी त्याने म्हटले, "हे पिक्चर फार चांगलं आहे. मी मुंबईला पाहिलं आहे. मद्दाम पुन्हा आलो."

ती काहीच वोलली नाही. आता काय करावे बुवा या चिंतेत रंगनाथ पडला. मग एकदम तिला म्हणाला, "अहो, अजून मला तुमचं नाव कळलं नाही. माझं नांव रंगनाथ. तुमचं ?"

नाईलाज झाल्यासारखा चेहरा करून ती म्हणाली, "जानकी."

"नांव जुनंच. पण नवं वाटतं. कारण जानकी, राधा, मुक्ता अशी जुनी नांवं पुन्हा देण्याची पद्धत सुरू झाली आहे. फार छान नांव आहे."

पण ती यावर काहीच वोलेना. तेव्हा तो म्हणाला, "तुमचं नांव जानकी असलं तरी अवोली हे नावच तुम्हाला शोभून दिसेल."

"अस्सं !" एवढेच ती म्हणाली.

तो परत म्हणाला, "तुम्ही जिमखान्याच्या वाजूला राहता का ?"

यावर काय पीडा आहे असा चेहरा करून ती उठली व सरळ थिएटरबाहेर पडली. रंगनाथ 'अहो अहो' म्हणत तिच्या मागोमाग बाहेर पडला. थिएटरमधले लोक चमत्कारिक मुद्रेने त्या दोघांकडे पहात होते. बाहेर आल्यावर रंगनाथ म्हणाला, "एवढ्या रागावू नका वुवा ?"

पण तिन उत्तर तर दिले नाहीच. पण रस्त्यावरून जाणारी रिक्षा थांबवली व तीत बसून निघून गेली.

रंगनाथ थक्कच झाला. नंतर पस्तावला. त्याला वाटले, आपणही लगेच रिक्षात बसून त्या रिक्षाचा पाठलाग केला असता तर तिचे घर नक्कीच माहीत झाले असते. पण ती संधी गेली. तरीही तो निराश झाला नव्हता. सतत प्रयत्न केला तर यश येणारच होते. संतत पडणाऱ्या पाण्याच्या धारेने कठीण दगडावरही खड्डा पडतो. मग आपल्या प्रयत्नांना यश यायला काहीच हरकत नाही.

पुन्हा जानकी दिसेल या आशेवर रंगनाथ निरनिराळ्या रस्त्यावरून, बागेतून, थिएटरवरून, कॉलेजवरून चकरा माहीत राहिला. आज ना उद्या ती आपल्याला दिसेल याची त्याला खात्री होती. आणि खरोखरच एका संध्याकाळी ती त्याला पेशवेबागेत दिसली. बागेतल्या तळ्यातल्या होडीत बसण्यासाठी लावलेल्या रांगेत ती उभी होती. तोही त्या रांगेत उभा राहिला. होडीत बसल्यावर त्याने तिच्याकडे पाहिले. तिचे प्रथम त्याच्याकडे लक्ष नव्हते. ती आजूबाजूला पहात होती. मग तिला तो दिसला. त्याबरोबर ती दचकल्यासारखी झाली. व तिने दुसरीकडे पहावयास सुरुवात केली. तळ्याला होडी फेरी मारीपर्यंत तिने मग त्याच्याकडे

[ पृष्ठ १६ वरून–**धूसर रेषा** ]

मीलन, उन्माद, एकत्व यांच्या अस्पष्ट रेषांवरून चालत असतो. वर्षानुवर्षे लोकांना पाहून मनी लज्जित झालेली ती दगडी शिल्पचित्रं . . . त्यांच्या गतिमान, आक्रमक, आत्मविश्वासपूर्ण वक्ररेषा हेच काय ते त्याचं श्रेय असतं. त्याच झपूर्झात तो अडकलेला असतो तसाच चालत असतो

रस्त्यावर येतो.

चालतोच आहे.

अचानक खूप गर्दी. माणसांचा आरडाओरडा. त्याच्या कानावर पडतो पण मनात शिरत नाही. अगदी . . .

घोळका त्याच्या समोर येतो.

तो थबकतो.

केवळ गर्दीला वाट द्यायसाटी.

जवळ आलेला एक इसम एका तरुण बाईला मारीत, झोडीत चालला आहे. ती ओरडते आहे. बघ्यांचा घोळका मागून चालतो आहे.

मारणारा त्यांच्यासमोर येतो. तो अचंब्याने बघतो. बघण्याची ती केवळ शरीरक्रिया.

मारणारा एकदम तोंड उघडतो, "साहेब, रांड मला सोडून, फसवून, त्या याराकडं जाते. बेइमान, फरेबी घरी गेल्यावर नाकच कापतो. काय समजली ?"

घोळका पुढं जातो.

त्याला अर्थबोध होत नाही.

. . . अजून तो रेषांच्या समाधीतच आहे. स्वतःला हरवून वक्र, गतिमान मीलन रेषा . . केवळ स्त्री नि पुरुष यांच्या मीलनरेषा

● ● ●

पाहिलेच नाही. होडीतून उतरल्यावर ती निरनिराळ्या प्राण्यांच्या पिंजऱ्याजवळ जाऊन प्राणी पहात उभी राहिली. रंगनाथने तिला गाठले व म्हटले, "म्हटलं, आपली ओळख झालेली आहे. असं अगदी ओळख नसल्यासारखं कां वागता आहां ?"

ती काहीच बोलली नाही. त्याने पुन्हा म्हटले, "मी म्हणतो ते खरं आहे ना ?" तरीही ती काही बोलली नाही. त्याने पुन्हा विचारले, "अशा गप्प कां ? आमच्यावर रागावला की काय ?"

तेव्हा ती त्याला हात जोडून म्हणाली, "हे पहा मी तुम्हाला हात जोडते. कृपा करून मला त्रास देऊ नका. तुम्ही मला गुंडाच्या तावडीतून सोडवलं त्यावद्दल मी तुमची त्रिवार आभारी आहे. पण त्याचा अर्थ असा नव्हे की तुम्ही माझा पाठलाग केलाच पाहिजे. माझी ओळख वाढवलीच पाहिजे. ओळख, परिचय, प्रेम, प्रेमविवाह अशा पायऱ्या ओलांडल्याच पाहिजे. अशा गोष्टी मी कथा, कादंबऱ्या व सिनेमात पाहिल्या आहेत. पण त्याचा अर्थ असा नव्हे की आपल्या दोघांच्या बाबतीत तसंच घडलं पाहिजे. तसं बंधन किंवा नियम नसावा असं मला वाटतं. म्हणून माझी तुम्हाला विनंती की तुम्ही मला पुन्हा त्रास देऊ नये."

एवढे तिचे लांबलचक बोलणे ऐकून रंगनाथ हबकलाच. त्याला तिचे दोनचार शब्दच ऐकायची सवय झाली होती. म्हणून आताचे तिचे भाषण ऐकून तो गारच झाला. काय बोलावे हे त्याला सुचेना. एखादी मुलगी असे बोलल्यावर काय उत्तर द्यावे हे त्याने कोठल्याही कथेत, कादंबरीत अगर सिनेमात पाहिले नव्हते. त्यांचा गोंधळ उडाला. मग त्याने चाचरत म्हटले, "बरं, तुम्ही म्हणता तसं नसेना का ? पण आपण मित्र म्हणून राह्यला काय हरकत आहे ?" यावर ती लगेच उसळून म्हणाली, मला साध्या मैत्रिणी सुद्धा नाहीत. मग मित्रांची गोष्ट बोलूच नका. मला हे आवडत नाही. माझी वाट सोडा."

"प्लीज माझं जरा ऐका."

"मला काही एक ऐकायचं नाही. रस्ता सोडा."

"अहो असं काय करता ?"

"तुम्ही वाट सोडणार की नाही ?"

"माझं ऐकून तरी घ्या."

"थांबा, तुम्ही तसं ऐकणार नाही" असे म्हणून तिने धावा, धावा असे ओरडण्यास सुरुवात केली. तावडतोव तिथे ही गर्दी जमली.

एकाने विचारलं, "बाई काय झालं ?"

ती म्हणाली, "या माणसानं माझा विनयभंग केला." रंगनाथ थक्कच झाला व म्हणाला, "काय विनयभंग ? मी केला ? काहीतरीच काय बोलता ?"

ती म्हणाली, "मी खरंच सांगते."

अता तुम्हाला गर्दीचे मानसशास्त्र माहिती आहे. गर्दी नेहमी स्त्रीची बाजू घेते. स्त्रिया स्त्रियांची बाजू घेतील यात शंका नाही. पण पुरुषांनी पुरुष सोडून स्त्रियांची बाजू घ्यावी हे खरे नाही. दोघाचौघांनी रंगनाथचे बकोटं धरले व म्हटले, "चला."

तो म्हणाला, "कुठं ?"

"चौकीवर."

काकुळतीने तो म्हणाला, "अहो मी काही केलं नाही. या बाई खोटं बोलत आहेत. मी नाही येत."

यावर दोघाचौघांनी त्याला चांगले फटके मारले. ते पाहून बाकीचे लोकही त्याला मारावयास धावले. ते पाहून रंगनाथ हात हिसडून पळाला. नाहीतर त्या लोकानी त्याला चांगले बडवून काढले असते. तो जिवाच्या भीतीने इतक्या जोरात पळाला की सर्व लोक मागे राहिले. खोलीत आल्यावर त्याला कळले की आपले सर्वांग ठणकते आहे. दोन दिवस तरी बाहेर पडणे शक्य नाही.

आणि त्या दिवसापासून रंगनाथने प्रतिज्ञा केली. संकटात असलेल्या सुंदरीला मदत तर करू नयेच पण संकटात नसलेल्या तरुणीलाही कधी मदतीचा हात पुढे करू नये.

● ● ●

**काश्मीरात महापूर**

आणि 'चिखला'त होड्या रुतल्या आहेत !

# कोना करयते वित्तम्

डॉ. शामसुंदर रघुवंशी, डी. लिट्.

जलाविना जसे मत्स्याने तडफडावे तद्वतच सोमदत्त मंचकावर वामबाहूवरून दक्षिण वाहूवर वळून निःश्वास सोडीत होता. अति विचाराने त्याची गात्रे गलित झाली होती. किंबहुना सारासार विचारशक्ती लोप पावून त्याची मतीच कुंठित झाली होती. निद्रादेवीच्या वरदहस्ताला आज तरी तो वंचित झाला होता. त्याचं कारणही तसंच होतं !

सुवर्णापेक्षाही कांतिमान भासलेल्या त्या सुडौल कुरंगनयनेनं अखेर आपलं मोल सुवर्णातच अपेक्षिलं होतं . एखाद्या यःकश्चित वारयोषितेलाही लज्जास्पद वाटेल इतक्या सहज सुलभतेनं ! म्हणूनच या तिच्या वक्तव्यानं सोमदत्त मनी कष्टी झाला होता. आणि अस्वस्थचित्त बनला होता.

तसा सोमदत्त या विषयात नवखा नव्हता. आजपर्यंत त्याने या क्षेत्रात उत्तम नामाभिधान प्राप्त केले होते. उत्तम तर्कशक्ती, चाणाक्ष अवलोकन आणि मदनासारखेच अचूक शरसंधान या त्रयोगुणांवर त्याने अनेक उत्तमांगीना करबद्धही केले होते. एखाद्या राजहंसाने नीर व क्षीर जितक्या सहजतेनं विलग करावं त्याच सुलभतेनं फक्त एका नेत्रकटाक्षातच, तो खरी कुलवती आर्या आणि उच्चकुलोत्पन्न असूनही चंचलनयना भार्या तात्काळ पारखीत असे.

परंतु आज मात्र त्याच्या करात दुग्धाऐवजी मलीन जलाचे उदक सांडले होते. आणि या अनपेक्षित घटनेनंच तो हताश झाला होता.

कारण आज माध्यान्ही मनाच्या दोलायमान अवस्थेतच त्या पुरुषपुंगवाने आपल्या अंतरातील व्यथा नगरशेट्टींच्या त्या हरिणाक्षी, कुसुमकोमल तन्वांगीजवळ व्यक्त



अनुक्रमणिका

केली होती. अत्यंत सावधानतेनं संधिसाधकाला शोभेशा चपळाईनंच ! आणि तेच कारण त्याच्या मनाला अस्वस्थ करण्यास कारणीभूत ठरले होते.

तसा शेट्टींचा तो अत्यंत निकटवर्ती स्नेही.त्यांच्या अंतर्गृहापर्यंत विनासायास प्रवेश करणारा—त्यांच्या कुटुंबियांपेक्षाही निकट भासणारा असल्यामुळे शेट्टींच्या गृही कोणत्याही समयी त्याचे स्वागतच होत असे. एक रसिक व उच्चकुलोत्पन्न स्नेही या नात्यानेच त्याची नित्य संभावना होत असे. तोही या स्नेहाचा आणि आदरातिथ्याचा यथोचित स्वीकार करीत असे.

त्याचा वरपांगी हेतू जरी स्नेहवर्धनाचा होता, तरी त्याच्या अंतर्यामी शेट्टींच्या त्या सर्वांगसुन्दर भार्येची अभिलाषाच वास करीत होती.ती हरिणाक्षीही आपल्या द्व्यर्थी वाक्बाणानं त्याला विद्ध करीत असे. त्यामुळेच तिच्या शब्दार्थांचा त्याला निश्चित अर्थ न उमगल्यामुळे, तिच्या अप्राप्य देहयष्टीप्रमाणेच तिचा स्वभावही त्याला अज्ञातच राहिला होता; परंतु 'कामातुराणां न भयं न लज्जा' या न्यायानं, तिच्या भोवती मोहजाल पसरून, त्याने तिला आपल्या वाक्चातुर्याने अखेर उद्दीपित केले. यथावकाश नेत्रपल्लवीनंतर त्याची मजल करपल्लवीपर्यंत पोहोचली. तिनेही त्याला विशिष्ट मर्यादेपर्यंत प्रतिसाद दिला. यामुळे सोमदत्त दिसागणिक अधिकच उत्साहपूर्वक तिचे प्रणयाराधान करू लागला.मात्र हे सर्व शेट्टींच्या अनुपस्थितीतच अनुसरावे लागे. आणि यास्तव माध्यान्ह कालच त्याला सोईस्कर वाटत असे. प्रतिदिनी शेट्टी जे प्रातःकाली वहिर्गमन करीत,ते सर्व व्यवहारांची पूर्णतः समाप्ती करूनच रात्रौ गलितगात्र होत्साते स्वगृही परत येत. यानंतर कसेवसे भोजनादी कार्यक्रम उरकून तत्क्षणीच लेखनिकासह—केलेल्या व्यवहारांच्या म्हणजेच पर्यायाने द्रव्यसंचयाच्या कार्यात गढून जात. संपत्तीच्या प्रलोभनापुढे त्यांना अन्य कोणतेही सुख कःपदार्थ वाटत असे व त्यामुळेच त्यांचे आपल्या सुडौल, मधुरभाषिणी भार्येकडेही स्वाभाविकच दुर्लक्ष होई व म्हणूनच ती गौरांगना नित्य असंतुष्ट राहिली होती.....याचबरोबर शेट्टींच्या अतिद्रव्यलोलुप वृत्तीमुळे तिच्या मूलतः खर्चिक असलेल्या स्वभावावर तर संपूर्ण बंधन पडले होते. अत्यल्प द्रव्यासाठी सुद्धा तिला शेट्टींची याचना करावी लागे. त्यामुळे आपले सुकोमल शरीर अत्युत्तम वस्त्रालंकारांनी आभूषित करण्याचे भाग्य तर तिला कदापीही न लाभल्याने सदोदित ती असंतुष्ट राहून आपल्याच पूर्वजन्माला दोष देत असे.

ह्या सर्व गोष्टींचे साकल्याने अवलोकन करूनच सोमदत्ताने आपले मायाजाल यथावकाश तिच्यावर पसरले होते. आपल्या कपटनाट्याचा पूर्वार्ध तिचे मन अधिकच असंतुष्ट व चंचल करण्यास्तव खर्चिला होता व उत्तरार्धात त्याची कामना पूर्ण केल्यास, तिच्या उत्तम वस्त्रालंकारांची मनीषा सुफलित करण्याचा आपला मनोदय आत्मविश्वासपूर्वक प्रकट केला होता. तो त्याचा मनोदय तिनेही सस्मित वदनाने स्वीकारिला होता.

त्या मधुरभाषिणीच्या अनुमतीमुळे सोमदत्ताचे हृदय पुलकित झाले आणि त्याचे विशाल बाहू तर आलिंगनोत्सुक होऊन तिच्या

....या तिच्या चातुर्यानं सोमदत्त मनोमन संतुष्ट जाहला आणि सुहास्य वदनानंच सुग्रास भोजनाप्रीत्यर्थ अंतर्गृहात प्रवेश करता जाहला....

कटिभोवती मंजी घालू लागले. तत्क्षणीच एखाद्या चपल हरिणीप्रमाणे तिने सोमदत्ताच्या मृगयेचा शर चुकविला आणि आपल्या नेत्रशरांनी दुरूनच ती त्याला विद्ध करू लागली. त्या कारणाने सोमदत्त अधिकच कामप्रज्वलित झाला, आणि तिच्या समीप येऊन तिच्याशी प्रणयकूजन करू लागला.

आपले मनोवांछित साध्य करण्याचा हाच तो निर्णायक क्षण हे त्या चतुरिकेने जाणले आणि आपले उत्तरीय जाणीवपूर्वक परंतु वरकरणी अजाणताच घरंगळू देऊन, कामविव्हल झालेल्या सोमदत्ताशी स्वयंप्रेरणेनेच जवळीक साधीत तिने आपले वाक्चातुर्य निःसंदिग्धपणे व कणलाही संभ्रम न बाळगिता प्रकट केले ! त्याला अभिप्रेत असलेले अर्पिण्यास ती अत्यंत उत्सुक होतीच; परंतु त्या बदल्यात भेट म्हणून वस्त्रालंकारादी गोष्टी स्वीकारण्यास ती किंचितही उत्सुक नव्हती. कारण मनोरथसिद्धी झाली की पुरुषांना स्मृतिभ्रंशाची बाधा होते व त्यामुळेच त्यांना वचनपूर्तीचे विस्मरण होते. यास्तव कर्मसाधनेपूर्वीच त्याचे मूल्य स्वीकारणे उचित असा तिने अभिप्राय व्यक्त केला. व वस्त्रालंकाराऐवजी एक सहस्र सुवर्णमुद्रा स्वीकारण्याचा आपला मनोदय प्रकट केला—नव्हे तसा आग्रहच धरिला. तो पूर्ण केल्यावर मात्र सर्वार्थाने सर्वस्व अर्पण करण्यास ती गौरांगना अत्युत्सुक होती ! इतकेच नव्हे तर त्या उत्कट क्षणाची ती प्रतीक्षाच करीत होती असे सोमदत्ताच्या करात आपली करमाला गुंफीत ती सुकोमला वदली.

या तिच्या निर्लज्ज उद्गारांनी व एखाद्या वारयोषितेलाच साजेशा वर्तनाने सोमदत्त हतबुद्ध झाला होता. तिच्या विषयीचे त्याचे प्रेम तत्क्षणीच नष्ट झाले व तिच्या या क्षुद्र स्वभावाविषयी त्याच्या अंतर्यामी कटुता निर्माण झाली. तरीही त्या अवस्थेत तिच्या सर्वांगसुन्दर देहाचा मोह त्या कामविव्हल पुरुषाला आवरिता येईना ! म्हणूनच त्याही द्विधा मनःस्थितीत सोमदत्ताने तिच्या इच्छेला विनाविलंब अनुमती दिली व त्याचे हे मनोवांछित शेट्टींच्या परदेशगमनकालीच तिने पूर्ण करावे असे सुचविले.

तिनेही सहर्ष त्याच्या सूचनेचे स्वागत केले. मात्र 'सहस्रमुद्रांचा लाभ झाल्यावरच !' तिने परत एकदा सूचित केले....

'पण या दासावर इतका अविश्वास ?' त्याने दुःखित स्वराने पृच्छा केली.

यावर तिने फक्त मधुर स्मित केले....

'ठीक आहे प्रिये....तू तुझ्या निश्चयापासून रतिभरही परावृत्त होणार नाहीस याबद्दल माझ्या मनात तिळमात्रही संदेह उरला नाही. तुझी ही इच्छा अवश्य पूर्ण होईल. परंतु त्याच बरोबर माझीही एक विनंती आहे....'

'कोणती आर्य?' तिने पृच्छा केली. 'तुला सहस्र सुवर्ण मुद्रांचा मोबदला देते वेळी माझा एकच परम स्नेही इथे उपस्थित असेल.' सोमनाथ निश्चयपूर्वक उत्तरिला.

'परंतु आपल्या मीलनसमयी त्रयस्थाचे काय प्रयोजन? जी गोष्ट अत्यंत गुप्ततेनं आचरावयाची त्याची त्या स्नेह्यामुळे वाच्यता होणार नाही का?

"नाही, नाही....कदापि नाही....या संदर्भात तू अगदी निःशंक राहा." सोमदत्त विश्वासपूर्वक उत्तरला. 'तो माझा परम स्नेही तू द्रव्याचा स्वीकार केल्यावर तत्क्षणीच स्वगृही गमन करील. कारण ते द्रव्य तू कां स्वीकारलेस त्याचे यत्किंचितही ज्ञान त्यास नसेल. फक्त द्रव्याच्या व्यवहारात साक्षी म्हणूनच त्याची मी योजना करीन.

"म्हणजे दासी आपल्या विश्वासास अपात्र ठरली का?" तिन मानभावीपणानं पृच्छा केली.

यावर सोमदत्तही स्मित हास्य करीत स्वगृही जाण्यास्तव उठला—मात्र त्या मदालसेच्या आमंत्रणाची अपेक्षा करूनच.

तथापि स्वगृही त्याला एक सहस्र सुवर्णमुद्रा निद्राधीन होऊ देईनात. त्याच्या मनःचक्षूसमोर त्या सुवर्णमुद्रांचेच नर्तन चालले होते. व तो क्षणोक्षणी अस्वस्थ होत होता. कारण सहस्रच काय परंतु दशमुद्रा सुद्धा त्याच्याजवळ नव्हत्या. आणि सहस्र मुद्रांचे दान केल्याशिवाय त्याचे ईप्सित साध्य होणार नव्हते. क्षणाक्षणाला त्याचा मनःस्ताप वाढत होता व तिच्याविषयीचा त्याचा क्रोधाग्नी अधिकच प्रज्वलित होत होता. परंतु येनकेनप्रकारेण हा कपिलाषष्ठीचा योग साधावयाचाच अशा निर्धाराप्रत येऊन आणि काही अंतिम निर्णय घेऊनच तो अखेर निद्रादेवीला शरण गेला.

पुढील सप्ताहपूर्ती होण्यापूर्वीच तिने सोमदत्ताला संदेश पाठविला की उदईक शेट्टी व्यवहारपूर्तीसाठी परदेशगमन करीत आहेत व अंदाजे हा संपूर्ण श्रावण मास तरी तत्प्रीत्यर्थ व्यतीत होईल. म्हणूनच फलप्राप्त्यर्थ हाच काल इष्ट! ...तरी त्वरेने कार्यसिद्धीसाठी कटिबद्ध व्हावे

हा संदेश मिळताच पूर्वनियोजनेनुसार सोमदत्त दुसऱ्या दिवशी संध्यासमयीच आपल्या स्नेह्यासहित तिच्या गृही प्रवेशिला. थोडेफार कुशल चिंतिल्यावर त्याने सुवर्णमुद्रांची थैली तिच्यासमोर रिती केली. तिनंही शांतचित्ताने ते मोजून अंतर्गृही नेऊन ठेवले. व सोमदत्तास त्या रात्रीचे भोजनाचे आमंत्रण देऊन त्याच्या स्नेह्याचा यथोचित सत्कार करून त्यास निरोप दिला.

या तिच्या चातुर्याने सोमदत्त मनोमन संतोषिला व सुहास्यवदनाने अंतगृहात भोजनाप्रीत्यर्थ अवतीर्ण झाला.

भोजनोत्तर यथावकाश आपल्या वाक्चातुर्याने तिला अधिकच उत्तेजित करीत व स्पर्शसुखाने तिला अतिशय कामविव्हल करून त्या पुरुषश्रेष्ठाने आपला शरीरदाह यथावकाश संपूर्णपणे शांत केला व तृप्तीचे उदक सोडून तिलाही गलितगात्र करून संतुष्ट मनाने उत्तररात्री तो निद्राधीन झाला. तीही कामसागराचे मंथन करून परम संतुष्ट झाली होती व अंतर्यामी, प्रतिदिनी याच कार्यास्तव कार्यरत होण्याचे मनोरथ उभारून निद्राधीन झाली.

याप्रमाणे उभयतांनी एकमेकांचे मनोगत जाणून त्याप्रीत्यर्थं काया-वाचा-मने संपूर्ण श्रावण मासभर ह्या व्रताचे निष्ठेने पालन केले.

परंतु प्रत्येक गोष्टीला मर्यादा असतेच या न्यायाने त्यांचे हे सांकेतिक मीलनही श्रावण मासान्ती संपुष्टात आले. कारण शेट्टींच्या पुनरागमनाचा काल अगदी समीप म्हणजे उदईकच येऊन ठेपला होता. व म्हणूनच दुःखित अंतःकरणानेच आगामी संधीची अपेक्षा करीतच ते युगुल एकमेकांपासून विलग झाले.

पूर्वनियोजनेनुसार शेट्टींचे स्वगृही आगमन झाल्यावर त्याच दिवशी संध्यासमयी सोमदत्त त्यांचे कुशल विचारण्यासाठी शेट्टींच्या गृही प्रवेशिला. त्याप्रसंगी पति-पत्नी मंचकावर बसून हास्यविनोदात कालक्रमणा करीत होती.

"यावे...यावे...कसे काय सोमदत्ता कुशल आहे ना तुझे?" शेट्टींनी मोठ्या आनंदाने पृच्छा केली.

"अगदी कुशल आहे मित्रा. मात्र तुझ्या अनुपस्थितीचे नित्य स्मरण होत होते!" सोमदत्त सस्मित स्वरात उत्तरला.

"ते अगदी स्वाभाविकच आहे... शेट्टी साभिमान उत्तरले. पण तू भोजनोत्तर उपस्थित झाला असतास तर मनःपूर्वक वार्ताविहार तरी केला असता. नाहीतर आता भोजनाची सिद्धता होईलच. आज इतक्या दिवसांनी तुझ्या पंक्तीचा लाभ मिळाल्यास भोजनाला आगळीच रुची येईल हे निःसंशय!" शेट्टी सुहास्य वदनाने उत्तरले.

'नित्य अशीच स्नेहवृद्धी व्हावी शेट्टी'.... सोमदत्त मनःपूर्वक उत्तरिला. "हां, पण माझ्या येण्याचा उद्देश मात्र निराळाच होता मित्रा. तू परदेशस्थ होण्यापूर्वी तुझ्या पेढीवर मी अचानक उपस्थित झालो होतो. स्मरण आहे?"

"हो...हो तर—तुझे विस्मरण कसे शक्य आहे?" शेट्टींनी पृच्छा केली.

"माझे विस्मरण झाले तरी काही नाही. परंतु तुझ्याकडून त्याच समयी मी एका नाजुक कार्यासाठी एक सहस्र सुवर्ण मुद्रा कर्ज म्हणून स्वीकारल्या होत्या. आहे स्मरण?"

"हो...हो तर? त्याचे विस्मरण कसे होईल मित्रा?"

"तर त्या नाजुक कार्यात मला अपयश आल्याने, उद्विग्न मनःस्थितीतच मी सर्वच्या सर्व म्हणजे एक सहस्र सुवर्णमुद्रा तुझ्या पत्नीस माझ्या एका मित्रासमक्ष परत दिल्या".

"अरे, अरे...त्या तात्काळ परतही दिल्यास? यथावकाश दिल्या असल्यास तरी मी काहीही म्हणालो नसतो"... शेट्टी समाधानपूर्वक उत्तरले.

"परस्त्री व परक्याचे धन या दोन्ही गोष्टींचा संग्रह म्हणजे धर्मशास्त्रानुसार महत्पाप म्हणूनच त्या त्याज्य! हे काय मी तुला सांगावे?" सोमदत्त संभावितपणे म्हणाला.

"होय...होय मित्रा तेही खरेच आहे....यात तू धर्मशास्त्राचेच पालन केलेस हे निर्विवाद! पण काय ग तू तत्संबंधी आज संपूर्ण दिवसात एकदाही या घटनेचा उल्लेख केला नाहीस माझ्याजवळ?" आपल्या प्रियदर्शिनीकडे साशंक दृष्टीने पाहात शेट्टींनी पृच्छा केली.

"अग बाई खरंच की! किती वेंधळी मी? आपल्या दर्शनाने सर्व गोष्टींचं विस्मरणच झालं मला." निष्प्राण झाल्यासारखी ती उभयतांची प्रियसखी उत्तरली व आपले सुकोमल परंतु औदासिन्याने झाकाळलेले मुख लपविण्यासाठी साश्रु नयनांनी ती अंतर्गृहात गमन करती झाली....इत्यलम!

• • •





अनुक्रमणिका

**....त्या दिवशी त्याने खूपच दारू झोकली होती. झोंकाड्या खातच तो रिंगणात येऊन गेला.... त्याने इतक्या वेगाने उड्डाण केले की त्याची मोटार-सायकल लाकडी तक्त्यापलीकडे दहा फूट पडली आणि....**

शि. शं. कार्लेकर

# डेअर डेव्हिल जेंकीन्स



कार्लेकर सर्कसचा चार खांबी भव्य तंबू दिव्यांच्या लखलखाटाने नुसता उजळून निघाला होता. बँडचा सुस्वर निनाद तंबूच्या आसमंतात भरभरून राहिला होता. तंबू प्रेक्षकांनी गच्च भरला होता. प्रेक्षक डोळ्यात तेल घालून शेवटच्या प्रयोगाची वाट पहात होते. शेवटी या प्रयोगाची तयारी पूर्ण झाली. मध्ये ५० फूट अंतर ठेवून दोन लाकडी तक्ते समोरासमोर असे रिंगणात ठेवण्यात आले. पैकी एक तक्ता दुसऱ्या तक्त्यापेक्षा थोडा उंच होता. लवकरच एक भीमकाय गौरवर्णीय पुरुप तंबूच्या बाहेरून फटफटीवरून वेगाने आत रिंगणात आला. त्याने कातडी पोशाख परिधान केला होता. डोक्यावर लोखंडी शिरस्त्राण होते. त्याने दोन्ही तक्ते तपासून पाहिले, प्रेक्षकांना अभिवादन केले व परत फटफटीवरून तो बाहेर गेला. नंतर त्याने इतक्या वेगात फटफटी परत आत आणली की एका क्षणात फटफटीने उंच तक्त्यावरून उड्डाण केले. पन्नास फूट दूर असलेल्या तक्त्यावर ती आदळली आणि वेगाने तंबूच्या बाहेर निघून गेली. लगेच फटफटी पुनः आत आली. त्या भीमकाय पुरुषाने आपले शिरस्त्राण काढले व प्रेक्षकांना आभिवादन केले. त्यावेळी टाळयांचा जो प्रचंड कडकडाट झाला त्याचे वर्णन करणे अशक्य. हा भीमकाय पुरुप म्हणजे सुप्रसिद्ध मोटार-उड्डाण-पटू जोई जेंकीन्स होय.

जोर्द जेंकीन्स यांचा जन्म इंग्लंडमधील यॉर्कशायर परगण्यातील एका खेड्यात झाला. त्याचे वडील विल्यम जेंकीन्स हे फार गरीब होते. वास्तविक हे जेंकीन्स घराणे पूर्वी फार श्रीमन्त होते. विल्यम जेंकीन्स यांचे वडिल लुई जेंकीन्स यांना दारूचे भयंकर व्यसन होते. तशातच ते एका वेश्येच्या नादी लागले. म्हणून शेकडो एकर जमीन ताब्यात असूनही त्यांना भयंकर कर्ज झाले. परंतु लुईला लागलेला वेश्येचा नाद सुटेना. जवळील पैशांचा झरा आटल्यामुळे ती वेश्या त्याला थारा देईना. एकदा तर तिने त्याला घराबाहेर जाण्याची आज्ञा केली. जिच्यासाठी आपण आपल्या इस्टेटीची राखरांगोळी केली तिने आपणाला अशी अपमानास्पद वागणूक दिली याची लुईला भयंकर चीड आली — व त्याने संतापून तिला ठार मारण्याच्या उद्देशाने तिचा गळा दाबला. हे पाहताच तिचे गुंड सायीदार धावतच तिथे आले व त्यांनी लाट्या-काठ्या घेऊन लुईला बेदम मारहाण करण्यास सुरुवात केली. लवकरच लुई रक्ताच्या थारोळ्यात खाली कोसळला. हे पाहताच ती वेश्या घाबरली व तिने आपल्या मोटारीतून त्याची त्याच्या घरी रवानगी केली.

रात्री सुमारे दोन वाजता गाडी लुईच्या घरासमोर आली. त्या वेश्येने त्याला तिथेच टाकून पोबारा केला. सकाळी जेव्हा विल्यम दरवाजा उघडून बाहेर आला तेव्हा त्याला आपला पिता मृतावस्थेत पडलेला तिथे आढळला. त्यावेळी त्याला जो शोक झाला त्याचे वर्णन करणे अशक्य. त्यावेळी त्याचे वय अवघे २२ वर्षांचे होते आणि विशेष म्हणजे त्याचे लग्न झाले होते. आपल्या वडिलांच्या












मृत्यूचे गूढ त्याला शेवटपर्यंत उकलले नाही. कारण आपले वडील कोणा वेश्येच्या नादी लागले होते हेच त्याला माहीत नव्हते. त्याचप्रमाणे पित्याने इस्टेटीवर कर्ज केले आहे हेही त्याला माहीत नव्हते. मात्र पित्याला दारूचे व्यसन आहे हे त्याला माहीत होते व त्या नशेत त्याला अपघात झाला असावा अशी त्याची कल्पना झाली; परंतु पुढे काही वर्षांनी त्याला सत्य घटना त्या वेश्येच्या एका साथीदाराकडून समजली. त्या साथीदाराचे त्या वेश्येबरोबर भांडण झाल्याने त्याने चिडून जाऊन इत्थंभूत हकीगत विल्यम यास सांगून टाकली. पण उपयोग काय ? वेळ टळून गेली होती.

लुईच्या मृत्यूनंतर लवकरच सावकारांनी लुईच्या घरावर जप्ती आणली तेव्हा विल्यम चकितच झाला. कारण इस्टेटीवर कर्ज असल्याचे त्याला माहीत नव्हते. ज्या सावकाराने जप्ती आणली तो सावकार शेक्सपियरच्या नाटकातील शायलॉकप्रमाणे दुष्ट होता. त्याने विल्यमच्या विनवण्यांकडे मुळीच लक्ष न देता सर्व इस्टेट जप्त केली. बिचाऱ्या विल्यमला घरादाराला मुकावे लागून पत्नीसह देशोधडीस जावे लागले.

घरदार सोडून विल्यम निघाला तो सरळ स्कॉटलंड येथे आला. स्कॉटलंडमधील एका खेड्यात त्याने मुक्काम केला. तेथे एका शेतात तो व त्याची पत्नी मोलमजुरी करून राहू लागले. यावेळी त्याची तरुण पत्नी गरोदर होती. लवकरच तिने एका सुन्दर गुटगुटीत बालकास जन्म दिला. त्यांचे नाव जोई ठेवण्यात आले. पुत्रप्राप्तीने विल्यमला इतका आनंद झाला की विचारता सोय नाही. त्याला जणु असमान ठेंगणे झाले. परंतु गरीबीमुळे त्याला जन्माचा उत्सव साजरा करता आला नाही. मात्र त्याच्याजवळ काही लव्हेंडरच्या बाटल्या होत्या. जमलेल्या मित्रमंडळीच्या अंगावर त्याने लव्हेंडर शिंपडले तेव्हा चोहोकडे सुवास नुसता दरवळून राहिला. विल्यमने आकाशाकडे पाहून हात जोडून म्हटले, "प्रभो या सुवासाप्रमाणे माझ्या पुत्राचा कीर्तीसुगंध सर्वत्र दरवळत राहो." विल्यमचे शब्द पुढे अक्षरशः खरे ठरले.

जन्मतःच जोईचे वजन इतर सामान्य मुलांपेक्षा पुष्कळच जास्त होते.त्याचे ते धष्टपुष्ट शरीर व आश्चर्यकारक वजन पाहून दवाखान्यातील डॉक्टर सुद्धा चकित झाले. हा मुलगा पुढे असामान्य शक्तीशाली होईल असे डॉक्टरने सांगितले हे ऐकून विल्यमला व मेरीला अगदी धन्य वाटले.

जोई जसजसा मोठा होऊ लागला तसतसा त्याच्या असामान्य शक्तीचा प्रत्यय येऊ लागला. त्याच्या बरोबरीच्या मुलांना तर तो सहज लोळवीत असे पण आपणाहून वयाने मोठ्या असलेल्या मुलांनाहि तो सहज धूळ चारीत असे. त्यांच्या वडिलांनी त्याला गावातल्या प्राथमिक शाळेत घातले तेव्हा अभ्यासापेक्षा मारामाऱ्या करण्यातच त्याचा वेळ व शक्ती खर्च होत असे. त्याच्या वडिलांकडे याबद्दल तक्रारी येऊ लागल्या. विल्यमने त्याला अनेकदा शिक्षाही केल्या पण त्याचा आडदांडपणा काही कमी झाला नाही. तेव्हा विल्यमला त्याच्याबद्दल चिंता वाटू लागली.

एके दिवशी जोईने अगदी कहरच केला. जोई वर्गात नेहमी खोड्या करीत असे. त्यामुळे त्याचे वृद्ध गुरुजी त्याला शिक्षा करीत. या गुरुजींनाच एकदा शिक्षा करण्याचे जोईने ठरविले. एके दिवशी कोणी नसताना त्याने गुरुजींच्या खुर्चीला बारीक चुका उलट्या ठोकून ठेवल्या. वृद्ध गुरुजींना नजरेने नीटसे दिसत नव्हते. त्यादिवशी नेहमीप्रमाणे गुरुजी वर्गात आले व खुर्चीवर बसले. त्याबरोबर खुर्चीला ठोकलेल्या चुका त्यांना इतक्या जोरात टोचल्या की ते किंचाळतच उठून उभे राहिले. ते पाहून जोई मोठमोठ्याने हसू लागला. इतर मुलांना या प्रकाराची काहीच कल्पना नसल्याने ती बिचारी चकित होऊन गुरुजींकडे पहातच राहिली.

तेव्हा खोडसाळपणा जोईचाच असल्याची गुरुजींची खात्री झाली. त्यांनी लांब वेताची छडी घेऊन जोईला बडविण्यास प्रारंभ केला. त्यांनी त्याला इतके बेदम मारले की तो मार जोईला असह्य झाला. शेवटी तो जिवावर उदार झाला. बारा वर्षांच्या त्या मुलाने गुरुजींचा गळा धरला व त्यांना खाली पाडून तो त्यांच्या छातीवर स्वार होऊन त्यांना लाथा-बुक्क्यांनी यथेच्छ बडवून काढू लागला. हा प्रकार काही मुलांनी पाहिला व ते धावतच जोईचे घरी गेले. त्यांनी विल्यमला सर्व प्रकार सांगितला. त्याबरोबर विल्यम धावतच शाळेत आला. पहातो तो गुरुजी मूर्च्छित होऊन पडले आहेत व जोई त्यांना यथेच्छ बडवीत आहे. हे पाहून विल्यमचा राग अनावर झाला. त्याने जोईला खसकन् ओढले व असा काही बडविला की तो मूर्छित होऊन खाली कोसळला. त्याच वेळी मेरी पण तेथे धावत आली व तिने जोईला विल्यमच्या हातून सोडविले.

इकडे विल्यमने मूर्छित झालेल्या गुरुजींना इतरांच्या साहाय्याने दवाखान्यात नेले. पण त्या छोट्याशा गांवात दवाखाना नसल्याने शेजारच्या गावी गुरुजींना नेण्यात आले. उपचार केल्यानंतर गुरुजी सावध झाले तेव्हा विल्यमने त्यांचे पाय धरून क्षमा मागितली. उदार हृदयी गुरुजींनीही त्यास क्षमा केली पण जोईला शाळेत घेण्यास साफ नकार दिला.

या घटनेनंतर जोईची शाळा सुटली ती कायमचीच. त्यावेळी तो चौथ्या इयत्तेत होता. जोईची शाळा सुटल्यामुळे त्याचे पुढे कसे होणार याची विल्यमला चिंता पडली. पण पुढे अशी एक घटना घडली की जोईच्या आयुष्याला वेगळी कलाटणी मिळाली.

एके दिवशी त्या छोट्या गावी एक छोटी सर्कस आली. इंग्लंड हे सर्कसचे माहेरघर. त्यावेळी इंग्लंडमध्ये अनेक छोट्या मोठ्या सर्कशी होत्या. विल्यमच्या गावी जी सर्कस आली होती तिचा मॅनेजर विल्यमचा मामेभाऊच होता. विल्यम जेव्हा सहपरिवार सर्कस पाहण्यास गेला तेव्हा हे मॅनेजर साहेब तंबूच्या प्रवेशद्वाराशीच खुर्चीवर बसले होते. त्यांनी विल्यमला पाहताच त्याला जवळजवळ मिठीच मारली. त्याचे नाव होते हॅरी. हॅरीला विल्यमने सर्व हकीकत सांगितली. ती ऐकून हॅरीला फार वाईट वाटले. हॅरीने आपल्या पुतण्याकडे पाहिले तेव्हा तर तो चकितच झाले. तो विल्यमला म्हणाला "अरे हा छोकरा

सर्कसच्या कामाला अगदी योग्य आहे. मी त्याला नि तुला पण सर्कस-बरोबर नेणार. शेवटी सर्व कुटुंब त्या सर्कसमध्ये सामील झाले.

स्वतः विल्यम हा मूळचाच विनोदी स्वभावाचा असल्याने त्याने विदुषकाचे काम लवकरच उत्तम प्रकारे शिकून घेतले. जोईला कसरतीची निरनिराळी कामे शिकविण्यात आली. शाळेमध्ये शिक्षणाची टाळाटाळी करणारा जोई कसरतीची कामे मात्र मनापासून शिकला. तो स्वभावाचा धाडसी असल्याने सर्कसमधली धाडसाची कामे त्याला फार आवडली असल्यास नवल नाही. मेरी उत्तम प्रकारचे नृत्य शिकली. अशा रीतीने संपूर्ण जेंकीन्स कुटुंबच सर्कसपटु बनले.

लवकरच ही सर्कस फिरत फिरत फ्रान्समध्ये पॅरीस मुक्कामी गली. फ्रान्समध्ये त्यावेळी गाजलेल्या ‘अमार सर्कसचा’ प्रयोग त्याच वेळी पॅरीस येथें होणार होता. तो पाहण्यासाठी हॅरी व जेंकिन्स फॅमिली पॅरिसला गेली. ती भव्य सर्कस पाहून सर्व दिपून गेले. त्या सर्कसमधील प्रयोग सर्वांनाच आवडला तो मोटार-उड्डाणाचा होय. या प्रयोगामध्ये दोन लाकडी तक्ते मध्ये काही अंतर ठेवून समोरासमोर असे रिंगणात ठेवण्यात येत. पैकी एक तक्ता दुसऱ्या तक्त्यापेक्षा थोडा उंच असे. नंतर एक मोटार सायकलस्वार इतक्या वेगाने मोटार सायकलवरून येई की फटफटी उड्डाण करून एका तक्त्यावरून दुसऱ्या तक्त्यावर उड्डाण करी. उड्डाणानंतर ती फटफटी पुनः भरवेगाने तंबूबाहेर जात असे. त्यावेळी तंबूतील प्रेक्षक टाळ्यांचा कडकडाट करीत. यापूर्वी हॅरी, विल्यम, जोई यांनी असला धाडसी प्रयोग कधीच पाहिला नव्हता. ते थक्कच झाले. जोईला तर या प्रयोगाने वेडेच केले. त्याने हा प्रयोग आत्मसात करण्याचा निश्चय केला. हॅरी व विल्यम यांनीही त्याच्या निश्चयास पाठिंबा दिला.

प्रथम जोई मोटार चालविण्यास शिकला. त्यावेळी तो १६ वर्षाचा होता पण दिसत होता २०–२२ वर्षाच्या धिप्पाड तरुणासारखा. लवकरच तो उत्तमपैकी मोटार सायकलपटु बनला. लवकरच दोन लाकडी तक्ते तयार करण्यात आले. प्रथम सरावासाठी दोन तक्त्यामध्ये कमी अंतर ठेवण्यात येई. नंतर वाढवीत वाढवीत ते ५० फुटापर्यंत नेण्यात आले. यामध्ये जोई यशस्वी झाला. अर्थात हे यश त्याला सहजासहजी मिळाले नाही. त्याला जबर किंमत द्यावी लागली. मृत्यूशी सामना करावा लागला.

जोईचा मोटार सायकल उड्डाणाचा सराव चालू असताना एकदा मोठा अपघात घडला. एके दिवशी त्याने तक्त्यावरून उड्डाण केल्यानंतर कसल्या तरी आवाजाने त्याचे लक्ष विचलित झाले व मोटारसायकलच्या हॅंडलवरचा त्याचा ताबा किंचित सैल पडला. या प्रयोगात अत्यंत एकाग्र नजर ठेवावी लागते. किंचित जरी दुर्लक्ष झाले तरी अपघात हा ठरलेलाच. त्याप्रमाणे एके दिवशी त्याची हॅंडलवरची पकड थोडीशी सैल होऊन त्याचा तोल गेला व तो धाडकन् पलीकडच्या तक्त्यावर कोसळला. मोटरसायकल त्याच्या अंगावर पडून तो जबर जखमी झाला. त्याला महिनाभर दवाखान्यात पडून रहावे लागले; पण नंतर काही दिवसातच जोई उत्कृष्ट मोटार सायकल उड्डाणपटु झाला.

ते १९१५ साल होते. नुकतेच युरोपमध्ये पहिले महायुद्ध सुरू झाले होते. जर्मनीने फ्रान्सवर हल्ला चढविला होता. जर्मनीचा बादशाह विल्यम कैसर याची सबंध युरोप जिंकण्याची महत्त्वाकांक्षा होती. अशा वेळी युरोपात रहाणे किंवा इंग्लंडमध्ये रहाणे धोक्याचे वाटून विल्यम जेंकीन्सने भारताला जाण्याचा परवाना कसाबसा मिळवून जेंकीन्स फॅमिलीने भारताकडे कूच केले व ते मुंबईत येऊन दाखल झाले.

तो १९१५ सालचा जानेवारी महिना होता. कर्मधर्मसंयोगाने त्यावेळी भारतात सर्वश्रेष्ठ असलेल्या "कार्लेकर ग्रॅंड सर्कस"चा मुक्काम मुंबईत चर्नी रोडवर होता. विल्यम जेंकीन्सने तावडतोब प्रो. शंकररावांची गाठ घेतली. प्रो. शंकररावांनी मोठ्या आनंदाने त्यांना द. म. १२०० रुपये पगारावर ठेवून घेतले. तेव्हापासून ते सर्कशीची अखेर होईपर्यंत म्हणजे १९४३ सालापर्यंत जेंकीन्स कुटुंबाने ‘कार्लेकर ग्रॅंड सर्कस’ची इमानेइतबारे नोकरी केली.

ज्यावेळी जेंकीन्स कुटुंबाने कार्लेकर ग्रॅंड सर्कसमध्ये प्रवेश केला त्यावेळेस मोटार सायकल उड्डाणाचा प्रयोग भारतात नवीन होता. त्यामुळे हा अद्भुत प्रयोग पहाण्यासाठी मुंबईकर प्रेक्षकांनी तंबूवर एकच गर्दी केली. व जिकडे तिकडे जोईच्या नांवाचा बोलबाला झाला. जोईला त्यावेळच्या मुंबईच्या इंग्रज गव्हर्नरांच्या हस्ते "डेअर डेव्हील जोई जेंकीन्स" ही बहुमानाची पदवी अर्पण करण्यात आली.

लवकरच प्रो. शंकररावांनी जोईला स्वतंत्र ३०० रुपये वाढवून दिले. विल्यम हा विदुषकाचे काम करीत असे. त्यावेळी कार्लेकर






सर्कसमध्ये उद्धवराव शेळके नांवाचे उत्कृष्ट विदुषक होते. त्यांनी व विल्यमनी अनेक विनोदी कामे (फार्स) बसविली होती. मेरी उत्कृष्ट युरोपियन पद्धतीचा नाच करीत असे.

मुंबईहून सुरत, नाडियाद व वडोदे येथील मुक्काम आटोपून सर्कस अहमदावाद येथे आली. मुंबईप्रमाणेच त्यावेळी अहमदावाद शहर कापड गिरण्यांसाठी प्रसिद्ध होते. अहमदावाद मुक्कामी सर्कस आल्यानंतर दोन तीन दिवसांनी 'परशुराम लायन सर्कस'ही अहमदावाद येथे येऊन दाखल झाली. आणि योगायोगाने त्या सर्कसचा तंबूही कार्लेकर सर्कसच्या पुढेच उभारला गेला. मध्ये फक्त रस्ताच काय तो आडवा आला होता. साहजिकच दोन्ही सर्कसमध्ये चढाओढ निर्माण झाली. तेव्हा प्रेक्षकांना आकर्षित करण्यासाठी जोईने एक अभिनव युक्ती योजली. त्याने तंबूच्या प्रवेशद्वाराशेजारी एक उंच प्लॅटफार्म (मचाण) तयार केला. व त्यावर आपल्या फटफटीसह तो वर चढला नंतर त्याने मोटारसायकलचा आवाज मोठ्याने काढण्यास सुरुवात केली. त्याच्या फटफटीचा आवाज इतका मोठा होता की 'परशुराम लायन सर्कस'जवळ उभे असलेले लोकसुद्धा कालकर सर्कसकडे धावत आले. व लवकरच 'कार्लेकर ग्रँड सर्कसचा' तंबू प्रेक्षकांनी गच्च भरला. पुढे लवकरच 'परशुराम लायन सर्कस'ला आपले चंबूगबाळे अहमदावादेहून हलवावे लागले.

अहमदावादेहून सर्कस मुक्काम करीत करीत दिल्ली येथे आली. या ठिकाणी जोईच्या आयुष्याला कलाटणी देणारी घटना घडून आली. दिल्लीचे स्टेशनमास्तर हे एक इंग्रज गृहस्थ होते. त्याना सर्कसचे भारी वेड. साहजिकच त्यांचे तंबूवर रोज येणे असायचे. जेंकीन्स कुटुंब त्यांचे जातभाई असल्याने लवकरच त्यांचा जेंकीन्स कुटुंबाशी दाट स्नेह जडला. स्टेशन मास्तरला एकुलती एक मुलगी होती. तिचे नांव वीरा. ती त्यावेळी सोळा सतरा वर्षाची होती व जोई २२।२३ वर्षाचा होता. दोघांचे प्रेम जमले व त्याचे रूपांतर विवाहात झाले. त्याच वेळी दुसरी एक आनंददायी घटना घडली. विल्यमची पत्नी मेरी प्रसूत होऊन तिला पुत्ररत्न झाले. त्याचे नांव फरेडी असे ठेवण्यात आले.

१९३४ सालची गोष्ट. त्यावर्षी सर्कस पुनः दिल्ली मुक्कामी आली. लाल किल्ल्यासमोरच्या भव्य पटांगणात सर्कसचा तंबू उभारण्यात आला होता. एके दिवशी सर्कसचा खेळ पहाण्यासाठी जोईचे सासरे (स्टेशन मास्तर) व त्यांची स्नेहीमंडळी आली होती. त्यांच्या समवेत जोईची पत्नीही खेळ पहाण्यास बसली होती. त्या सर्वांना विशेषतः जोईचा मोटार उड्डाणाचा कार्यक्रम पहावयाचा होता. हा प्रयोग अत्यंत चित्तथरारक असल्याने तो सर्वात शेवटी ठेवण्यात येई. आपली स्नेही मंडळी आलेली असल्याने जोईला विशेष स्फुरण आले. त्यादिवशी त्याने खूप दारू प्याली होती. तो झोकांड्या खातच रिंगणात आला. हे पाहून प्रो. शंकररावांनी मोटार उड्डाणाचा कार्यक्रम रद्द करण्याविषयी निरोप पाठविला पण जोईने तो मानला नाही. त्याने त्या दिवशी दोन तक्त्यांमधील अंतरही पाच फूट अधिक ठेवले. त्या दिवशी जोईने इतक्या वेगाने उड्डाण केले की त्याची मोटर सायकल तक्त्याच्याही पलीकडे दहा फूटावर जाऊन आदळली व इतक्या वेगाने तंबूबाहेर गेली की त्याला ब्रेक लावता येईना. तंबूच्या बाहेर असलेल्या एका भिंतीवर अत्यंत वेगाने मोटर सायकल आदळून तिचा पार चुराडा झाला. हँडल जोईच्या छातीत शिरून तीन बरगड्या मोडल्या. पायांना व डोक्याला जबर मार बसला. डावा हात मोडला. रक्ताच्या थारोळ्यात जोई मूर्च्छित होऊन पडला. ही वार्ता तंबूत कळताच एकच हलकल्लोळ उडाला. जोईचे सासरे व मित्र धावत आले व त्यांनी जोईला तावडतोब दवाखान्यात नेले. डॉक्टरांनी तावडतोब उपचार केले. परंतु या अपघातातून जोई वाचणार नाही असे मत त्यांनी व्यक्त केले. परंतु काय आश्चर्य त्याही अपघातातून जोई वाचला.

परंतु त्याला एक वर्ष दवाखान्यात पडून रहावे लागले. तो केवळ राक्षसी शक्तीचा माणूस म्हणूनच या अपघातातून वाचला असे उद्गार नंतर डॉक्टरांनी काढले.

या अपघातातून वाचल्यानंतर जोईने पुनः आपला मोटार उड्डाणाचा कार्यक्रम चालू केला. १९४३ साली कार्लेकर सर्कस कलकत्त्याहून ब्रह्मदेशात रंगून शहरी आली. जोई हा बरोबर होताच. त्याची पत्नी मात्र गरोदर असल्याने दिल्लीला आपल्या पित्याकडे गेली होती. रंगून मुक्कामी सर्कस असताना अचानक जपानचा बाँबहल्ला झाला व सर्कसची वाताहत झाली. सर्कसचे सर्व लोक पायीच हिंदुस्तानला येण्यास निघाले. वाटेत नागा लोकांनी सर्कसच्या लोकांवर हल्ला चढविला. त्यावेळी जोई आदि इंग्रज लोकांजवळ बंदुका होत्या. जोईने आपल्या बंदुकीने अनेक नागा लोकांना ठार केले. शेवटी त्याला इतका त्वेष चढला की त्याने बंदुकीच्या दस्त्याने नागांना बडविण्यास सुरुवात केली. त्याचा प्रहार इतका जबरदस्त असे की एका प्रहारासरशी एक नागा ठार होऊन जात असे. परंतु या गडबडीत जोई इतर लोकांपासून बराच दूर गेला हे पाहून नागा लोकांनी त्याला चहूबाजूंनी वेढले व त्याच्यावर बाणांचा वर्षाव केला. मनुष्य कितीही शूर असला तरी असंख्य लोकांपुढे तो एकटा काय करणार? लवकरच शरीरावर असंख्य जखमा होऊन रक्ताच्या थारोळ्यात पडला. त्याची प्राणज्योत अनंतात विलीन झाली. तो मरण पावला तरी दुष्ट नागांनी भाल्या-बरच्यांनी त्याच्या शरीराचे तुकडे केले. शेवटी सर्कसचे लोक धावत येत आहेत असे पाहून नागा पळाले.

आपल्या लाडक्या पुत्राचा तो भयंकर शेवट पाहून विल्यमला शोक अनावर झाला. शोकावेगाने त्याने जोईच्या मृत देहाला कवटाळले ते कायमचेच. त्यानेही आपल्या प्रिय पुत्राच्या भेटीसाठी नश्वर देहाचा त्याग केला व तो त्याच्या भेटीसाठी निघून गेला.

• • •

क्षणोक्षणी
श्वास रोखणारी
एक चित्तथरारक
कादंबरिका

—नारायण धारप




"खूप ब्लीडींग होईल असं वाटलं होतं मला....पण तसं काहीही झालं नाही! यू नो, काही काही वेळा शरीर ग्राफ्ट ॲक्सेप्ट करीत नाही, रिजेक्ट करतं...." डॉक्टर मला म्हणाले ....

आबासाहेबांच्या मोठ्या वाड्याला भेट म्हणजे चंदूला एक संकटच वाटायचे. वयाने मोठा झाल्यावर मनातली ही भीती बरीचशी कमी झाली होती, पण तरीही मनात जी एक धास्ती असायची ती कधीच पूर्णपणे गेली नाही. आबासाहेब चंदूचे दूरचे (आईकडून) आजोबा लागत होते. अगदी लहान असतानापासून आईबरोबर त्यांच्या मोठ्या वाड्याला दिलेल्या भेटी त्याला चांगल्या आठवत होत्या. मोठ्या वाड्यात पाय टाकल्यापासून त्याला सारे जण बजावीत असायचे "चंदू ! मोठ्याने आवाज करू नको ! आबासाहेबांना त्रास होईल !"; लोटीवर भांडं आपटलं तरी तेच, जिन्याची एखादी पायरी जोराने उतरला तरी तेच. ..आबासाहेबांना कशाने त्रास होणार नाही हेच शेवटी त्याला कळेनासे झाले होते. आणि मग प्रत्यक्ष आबासाहेबांशी भेट. तो नको नको म्हणायचा, अंग मागे ओढायचा पण आई त्याला हाताने घट्ट धरून जवळजवळ ओढतच, वळेवळेच आबासाहेबांच्या भेटीला घेऊन जायची. ते कधी आराम-खुर्चीवर बसलेले असायचे. कधी लोडाला टेकून गादीवर बसलेले असायचे. त्यांच्याकडे टक लावून पहाणं चंदूच्या शक्तीपलिकडचं होतं; एक दोनदा तिरकस नजरेने पाहिल्यावर तो मान खाली घालून उभा राही; ते त्याला चारदोन प्रश्न विचारीत, त्यांना तो तोंडातल्या तोंडात काहीतरी गुणगुण करून उत्तर देई; आणि मग ही भेट संपायची. त्याला आठवण रहायची ती त्या प्रशस्त दिवाणखान्याची (केवळ एकट्या आबासाहेबांसाठी केवढी प्रचंड खोली !) आणि अगदी ओझरतं पाहिलेल्या त्यांच्या चेहेऱ्याची; डोक्यावर सफेत केस, मधे टक्कल, गोरापान चेहरा, लालबुंद गाल, तापट वाटणारे डोळे (त्यांच्यावर कधी कधी सोनेरी काड्यांचा चष्मा); बसलेले असतानाही प्रचंड वाटणारे शरीर, हातात मिटून धरलेल्या पुस्तकावर बोटांची टकटक.... त्याच्या अनेक भेटीत हे चित्र जराही बदलेलं त्याला आठवत नव्हती.

आणखी जरा मोठा झाल्यावर चंदूला आबासाहेबांच्या ऐश्वर्याची खरी कल्पना आली. तो त्यांचा प्रचंड वाडा, घरातली गडी-माणसांची वर्दळ, येणारा-जाणारांची गर्दी, पोस्टमन रोज त्यांच्यासाठी घेऊन येणारी पत्रांची रास   आबासाहेब हे खरोखरच कोणीतरी महान असामी असले पाहिजेत ही त्याची खात्री झाली. आईला विचारून पाहिलं, पण त्या विचारीची माहिती अगदीच मोघम होती—"चंदू ते पूर्वी मोठे न्यायाधीश होते; आता रिटायर झाले आहेत, हल्ली नेहमी काहीतरी पुस्तके लिहीत असतात;

अनुक्रमणिका

अनेक समारंभाना जात असतात. . पण काय करतात ते वरीक मला विचारू नकोस–कारण मला त्यातलं काही कळत नाही–"

चंदू शाळेत जाऊ लागला. हायस्कूलमध्ये जायला लागला. आवासाहेबांकडच्या दोन तीन महिन्याकाठच्या भेटी चालल्याच होत्या. आता तो त्यांच्या वाड्याच्या मोठ्या दारावरची पाटी वाचू शकत होता. "रा. शं. (आवासाहेब) मोहळकर (रिटायर्ड जज्ज ऑफ दि बॉंबे हायकोर्ट)." मोठे न्यायाधीश तर खरेच ! त्याला वाटलं. एकदा त्याने भीतभीत सरांना त्यांच्या विषयी विचारलं. पण मग त्याला कळलं की भिण्याचं काही कारण नव्हतं. आवासाहेब मोहळकरांशी अगदी दूरचं नातं असणं हीसुद्धा एक गौरवाची गोष्ट होती. सरांच्या सांगण्यावरून असं दिसलं की निवृत्तीनंतर आवासाहेबांनी स्वतःला आपल्या आवडीच्या व्यासंगाला पूर्णपणे वाहून घेतलं होतं. काहीतरी प्राचीन विषयांवर ते सारखा अभ्यास आणि संशोधन करीत असत एवढंच चंदूला त्या लहान वयात समजलं.

हायस्कूल शिक्षण संपून चंदू कॉलेजमध्ये जायला लागला. मध्यंतरी त्याची आई दुर्दैवाने कालवश झाली होती. त्यानंतर पाचसहा महिने आबासाहेबांकडे तो फिरकलाच नव्हता, पण ते त्याला विसरले नव्हते असं दिसलं. कारण एका सकाळी त्याला त्यांचं पत्र मिळालं. त्याच्या आईच्या मृत्यूबद्दल पत्रात त्यांनी सहानुभूती दर्शवली होती आणि आईच्या मृत्यूमुळे त्याच्या नेहमीच्या भेटीत खंड पडू नये अशी इच्छा पण व्यक्त केली होती. चंदूला माहीत होतं की त्याला आवासाहेबांकडे जायलाच हवं. तशी त्याच्यावर कोणतीच सक्ती नव्हती, पण त्यांची सूचना म्हणजे एक आज्ञाच होती.

आई बरोबर नसताना तो प्रथमच त्या अवाढव्य वाड्यात जात होता. त्याचं मन खूप मागे गेलं आणि अगदी पूर्वी त्याला जसं धास्तावल्यासारखं वाटायचं तसंच वाटायला लागलं. आई घरातल्या इतर माणसांशी काही बोलत बसायची, त्याला तर तेही शक्य नव्हतं. दिवाणखान्यातल्या एका खुर्चीवर तो अवघडल्यासारखा बसून राहिला. मधेच तर एकदोनदा तसंच बाहेरच्या बाहेर सटकावं असाही विचार मनात आला–पण कोणी पाहून हसं होण्याची धास्तीच जास्त प्रभावी ठरली व तो तसाच बसून राहिला.

शेवटी आबासाहेबांचं बोलावणं आलं तेव्हा जिना चढताना तर त्याचे पाय अक्षरशः लटपटत होते. श्वास छातीत रोखूनच तो त्यांच्या खोलीत शिरला; पण त्याची अपेक्षा होती तसं काही भयंकर घडलं नाही. संकटापेक्षा संकटाच्या केवळ कल्पनेनेच माणूस जास्त हाय खातो हेच खरं. चारदोन औपचारिक प्रश्न झाल्यावर त्याला रजा मिळाली. वाड्याबाहेर पडताना त्याला एकदम हलकं हलकं वाटत होतं–इतकं भ्यायचं काहीच कारण नव्हतं ! तो स्वतःशीच म्हणत होता.

पण आबासाहेबांबद्दल एक आकर्षण मात्र मनात कायम राहिलं आणि त्यांच्या भेटी पूर्ववत् सुरू झाल्या. आबासाहेबांच्या आसपासच्या वातावरणातले अनेक लहान मोठे प्रवाह त्याला आता समजू लागले. त्याला स्वतःला आबासाहेबांकडून कशाचीही अपेक्षा नव्हती (आणि हे त्याच्या वागणुकीत उघड होत असलं पाहिजे, म्हणूनच ते त्याला इतक्या आग्रहाने बोलवून घेत होते–पुढे विचार केल्यावर त्याला हे समजलं.) पण त्यांची इस्टेट अवाढव्य असली पाहिजे त्याच्यावरच डोळा ठेवून त्यांच्या आसपास इतकी लाचार माणसं जमली होती. आवासाहेबांचा खोटा बडेजाव वाढविण्यात या लाचारांच्या खोट्या स्तुतीचाच भाग अधिक होता. कारण चंदू जसजसा मोठा होत गेला तसतसं त्याला समजलं की आवासाहेब शिस्तीचे व टापटीपीचे भोक्ते असले तरी हुकूमशाही नव्हते. त्यांच्यात भिण्यासारखं तर काहीच नव्हतं. (स्वतःच्याच झालेल्या बदलाने आपला दृष्टीकोन बदलला आहे हे चंदूला मागाहून समजलं.) जन्मभर सचोटीने वागल्याने आवासाहेबांच्यात एक बेडरपणा होता. आणि शिवाय त्यांचा गाढा व्यासंग–तेव्हा त्यांचा अभिमानही सार्थ होता.

## [२]

कॉलेजच्या तिसऱ्या वर्षाअखेरच्या सुटीत आवासाहेबांसाठी काही काम करायची चंदूला संधी मिळाली. त्यावेळी त्याला त्यांच्या चिकित्सक, सर्वग्राही बुद्धिमत्तेची खरी जाणीव झाली. प्राचीन भारतातील काही अज्ञात पंथावर त्यांना एक ग्रंथ लिहायचा होता. कित्येक वर्ष ते त्यासाठी माहिती, संदर्भ, पुरावे जमवत होते. आणि त्यासाठी त्यांनी भारतातल्या अनेक दुर्गम स्थळांना प्रत्यक्ष भेटीही दिल्या होत्या. एकेका कागदपत्राच्या किंवा नकलेच्या अनुषंगाने आवासाहेब कधी कधी ज्या आठवणी सांगत त्या ऐकून चंदू मनातल्या मनात आश्चर्याने थक्क झाला. त्यांच्या स्वभावाचा हा एक नवा आणि अनपेक्षित पैलू होता. कोणता तरी एक जुना ग्रंथ घेऊन त्यातल्या कानामात्रांची चिरफाड करून शब्दच्छलाने पाठभेदांचे अवडंबर माजवणारांपैकी ते नव्हते. त्यांना जे महत्त्वाचे वाटत होते ते ते त्यांनी हस्तगत केले होते, निदान प्रत्यक्ष भेट देऊन डोळ्याखालून तरी घातलं होतं. दिवाणखान्यात गाद्यागिरद्यांवर लोळणारा हा पांढरपेशा माणूस–मनाने घेतलेल्या एका ध्यासासाठी इतके शारीरिक कष्ट उपसेल यावर सहज विश्वास बसणं कठीण होतं. एखाद्या ठिकाणी काही माहिती किंवा कागदपत्र किंवा इतर साहित्य मिळण्यासारखं आहे असं समजल्यावर मग आवासाहेबांनी कोणत्याही अडचणींची पर्वा न करता त्या स्थळाला भेट दिली होती. जमला तेवढा प्रवास स्वतःच्या गाडीने नाहीतर मग आगगाडी, बस, टांगा, बैलगाडी यांचा वापर करायला किंवा अगदीच तशी वेळ आली तर मैलोमैल पायांनी तुडवायलाही त्यांनी मागे पुढे पाहीलं नव्हतं. तेव्हा इतर सुखासीन लोकांबद्दल त्यांना वाटणारी तुच्छता रास्तच होती. त्यांच्या त्या साहित्याने भरलेल्या पेट्या उघडताना त्यांचे डोळे सोनेरी चष्म्यामागे जरा मिस्किलपणे लुकलुकत असायचे.

"आताशी ही रग–रगच नाहीतर काय ?–फार थोड्यांच्यात दिसते चंदू–" ते म्हणायचे. "जागचं हलायचा आळस–मग इतरांची मतं काठीसारखी वापरावी लागतात–जन्माचं आंधळेपण, हो ना ?"

त्यांच्या पेट्यातून जुने कागद, भूर्जपत्रे, चमत्कारिक विणकाम केलेली रेशमी वस्त्रे, तऱ्हेतऱ्हेच्या आकाराचे बाण, चमत्कारिक शिल्पाकृती, लाकडाच्या अनेक कोरीव आकृती . . . . काहीही






निघायचं. पण प्रत्येक वस्तूची तारीखवार नोंद, तिचं स्थळ, उत्पत्ती काळ, साक्ष, या साऱ्यांचं संपूर्ण टिपण तयार. स्मरणशक्तीवर कोठेही भरंवसा नाही. आणि त्यातल्या प्रत्येक वस्तूला एक इतिहास होता–कधी मनोरंजक, कधी थरारक.

"माझं हे संशोधन काही जणांना चमत्कारिक वाटतं गूढ धर्मपंथांबद्दल सर्वत्र एक संशयाची, अविश्वासाची आणि जराशी धास्तीची प्रतिक्रिया आढळते. त्यातले सर्वच वाममार्गातले किंवा अदैवी उपासनेचे होते अशातला भाग नाही. काहीना रहस्य हेच आकर्षण होतं, काहीमध्ये रहस्य हे मूळ उपचारांचा अर्थ न समजल्या-मुळे मागे राहिलेल्या केवळ यांत्रिक हालचालींनी आलं होतं. पण काही ठिकाणची गुप्तता मात्र हेतू पुरःसर होती. तेथली उपासना साधी नाही याची मला वारंवार जाणीव झाली. मला अनेकांनी या निषिद्ध गोष्टीत फार खोलवर न जाण्याचा सल्लाही दिला.. मी त्यांचा चांगला हेतू जाणू शकतो... पण मी कशालाही डगमगलो नाही..."

समोरच्या पसाऱ्यावरून त्यांचे स्मृतींनी भरलेले डोळे फिरत होते. "त्यांच्यावर विश्वास टेवायचा तर मी त्यांचे अनेक नियम मोडलेले आहेत, अनेक संकेतांचा भंग केलेला आहे....वेळ आली तर अजूनही करीन माझ्या संशोधनासाठी कोणताही धोका पत्करायची माझी तयारी आहे" आणि जरा वेळ थांबून–"पण मला वाटतं हे इशारे आणि हे नियम रहस्य टिकवण्याचेच काही भाग आहेत. मी स्वतः सर्वातून गेलो आहे आणि धडधाकट आहे. दिवसा किंवा रात्री कोणत्याही वेळी मला कसलाही त्रास झालेला नाही. कधी काळी होईल असं वाटतही नाही. आपण मन खंबीर ठेवलं की त्यावर कशाचीही मात्रा चालत नाही.... शेवटी शरीर हे एक यंत्र आहे.... त्याची कार्यक्षमता जागरुक, निर्धारी मनावर अव-लंबून आहे.... आणि मी अगदी सुरक्षित आहे... त्यांच्या अंधश्रद्धा मला स्पर्श करू शकत नाहीत–"

पुढे चंदूला या आत्मविश्वासपूर्ण शब्दांची (एका अगदी वेगळ्या संदर्भात) आठवण येणार होती; आता तो आबासाहेबांचे शब्द लक्ष देऊन ऐकत होता. आणि त्यांच्या हकीकती खरोखरच ऐकण्या-सारख्या होत्या. तेव्हा त्याची ती सुटी तशी गेली. आबासाहेबांचा जवळून परिचय झाला. त्यांच्या त्या खास विषयाचं त्याचं ज्ञान वरवरचंच राहिलं. त्यात चंदूला खरी गोडी कधी लागलीच नाही. त्याच्या आवडीनिवडी वेगळ्या होत्या. पण तो मनापासून काम करीत राहिला, कारण आबासाहेब त्याच्याबद्दल एक व्यक्ती म्हणून त्याला अनावर कुतूहल होतं.

यथावकाश त्यांचा संदर्भग्रंथ प्रसिद्ध झाला. एका मर्यादित वर्तुळातच त्याची दखल घेतली गेली. आबासाहेबही सवंग लोक-प्रियतेच्या मागे कधी नव्हते. काही जड व गंभीर मासिकांतून त्या ग्रंथावर साधक बाधक चर्चा झाली. त्या प्रचंड कामानंतर आबा-साहेबांना काही दिवस विश्रांती घ्यावी लागली. शरीराबद्दल त्यांच्या कल्पना काही असल्या तरी त्याच्या मागण्या शेवटी त्यांनाही मान्य कराव्या लागल्याच. चंदूचेही शेवटचे वर्ष होते आणि अभ्यासाची आवश्यकता भासत होती. त्या वर्षात त्याचे आबासाहेबांकडचे जाणे-येणे बरेच कमी झाले.

परीक्षा झाल्यावर (तृतीय श्रेणीत उत्तीर्ण होऊन) नोकरीसाठी त्याला बाहेरगावी जायची वेळ आली. जाताना त्याने आबासाहेबांची गाठ घेतली. त्याला ते बरेच थकल्यासारखे दिसले. अर्थात याबद्दल त्यांच्यापाशी एक शब्दही बोलणं शक्य नव्हतं, पण वर्षानुवर्ष त्यांनी आपल्या शरीराला दामटलं होतं त्याचे परिणाम आता दिसायला लागले होते. मनाची उभारी अजून कायम होती, पण शरीराची साद मिळत नव्हती आणि त्यांचा स्वभाव जरासा चिडखोर झाला होता.

चंदू आपल्या व्यापात गढून गेला. त्याच्याच ऑफिसात काम करणारा गोपाळ महाजन आणि तो, दोघांनी मिळून एक जागा भाड्याने घेतली होती. नव्या ओळखी, नवे छंद, काम इत्यादीत दिवस कसे भराभर जात होते. मागच्या सर्व आयुष्यावर विस्मृतीचा एक झिरझिरीत पडदा ओढला गेला होता. वर्तमानपत्रात त्याने जेव्हा आबासाहेबांच्या आजारीपणाची बातमी वाचली तेव्हा हा पडदा एकदम दूर झाला आणि जुन्या कितीतरी आठवणी एकदम

समोर उभ्या राहिल्या. चंदूला एकदम उमगलं की आता पत्राने चौकशी करीत बसण्याची वेळ नाही, आपण स्वतःच आबासाहेबांना जाऊन भेटायला हवं. वर्तमानपत्रातील मजकुरावरून त्यांचा आजार गंभीर स्वरूपाचा वाटत होता. चंदूने आठ दिवसांची रजा काढली आणि तो निघाला.

## [ ३ ]

आबासाहेबांच्या वाड्यावर पोचायला त्याला संध्याकाळ झाली. पूर्वीच्या त्या भेटी आठवून त्याला स्वतःचीच मौज वाटली. वाड्याची ती रास पूर्वी प्रचंड वाटायची. मनावर एक प्रकारचा दबाव यायचा. आता तो तिकडे त्याच्या खऱ्या स्वरूपात पाहू शकत होता. तो एक जुन्या पद्धतीचा, प्रशस्त बांधणीचा तीनचौकी वाडा होता. ऐश्वर्याच्या खुणा सर्वत्र होत्या, पण त्यात विचकण्यासारखं काहीही नव्हतं. हॉलमधल्या गड्याजवळ त्याने आपण आल्याचा निरोप दिला आणि तेथल्याच एका खुर्चीवर तो शांतपणे बसून राहीला. एक गोष्ट मात्र त्याच्या ध्यानात आली–सर्वत्र एक गंभीरपणा होता; माणसं पाय न वाजवता चालत होती, हलक्या आवाजात बोलत होती. आबासाहेबांच्या आजाराची छाया सर्व वाड्यावर पडली होती. आणि तो वर प्रत्यक्ष त्यांच्या खोलीत गेला तेव्हा त्याला दिसलं की आबासाहेब खरोखरच फार आजारी आहेत. अगदी कॉटजवळ जाईपर्यंत त्याला नीट काही दिसलंच नाही, कारण खोलीच्या खिडक्यांवरून निळे पडदे ओढलेले होते. तो जवळ गेला तेव्हा त्याला दिसलं की आबासाहेब अगदी खंगले आहेत, विकलांग होऊन पडले आहेत. पण त्याला खरा धक्का बसला तो त्यांच्या डोळ्यावरचा काळ्या काचांचा चष्मा पाहून. तसा खोलीत अजिबात प्रकाश नव्हता. मग––

"कोण चंदू का ? ये रे, बस. केव्हा आलास ?" आधी आबासाहेबांचा आवाज त्याला ओळखूच आला नाही, इतका तो बदलला होता. त्यातली ती रग, ती उभारी, तो अभिमान, सारं काही गेलं होतं. तो थकलेला वाटत होता.

"हा आताच येतो, आबासाहेब. काल पेपरमध्ये वाचेपर्यंत मला काही कल्पना नव्हती." त्यांना काय झालं होतं हे त्याला सरळ विचारणं शक्यच नव्हतं.

"आधी साधा फ्ल्यूसारखा ताप वाटला–डॉक्टरांनाही त्यात काही गंभीर आहेसं वाटलं नाही    पण मग अगदी शक्तीपातच झाल्यागत झालं    आता जरा बंद आहे . . .    पण डोळे . चंदू, डोळेच अजिबात कामातून गेलेत!"

"जरा शक्ती आली की–" चंदूला त्यांनी मधेच थांबवलं. एक हात निराशपणे हलवत ते म्हणाले "नाही–डोळे सुधारायची काही आशा नाही ! ब्लडप्रेशरच्या अटॅकने डोळ्यात काहीतरी हेमरेज झालंय् वाटतं    मला मन घट्ट केलं पाहिजे–मी आता आंधळाच होणार आहे–" शेवटच्या वाक्यात परत एकदा ती जुनी ठिणगी चमकल्यासारखी वाटली.

चंदू त्या खेपेस चार पाच दिवस त्यांच्याकडे राहिला. आबासाहेबांची प्रकृती सुधारत होती तसा त्यांच्या मनाचा कठीणपणाही परत येत होता. दृष्टी गेली ही सत्यस्थिती त्यांनी मान्य केली होती आणि त्याचा शोक करीत न बसता आल्या परिस्थितीला तोंड कसं द्यायचं याचा विचारही सुरू केला होता. ब्रेल लिपीच्या शिक्षणासाठी त्यांनी साहित्य आणि शिक्षक यांचा शोधही सुरू केला होता. चंदू परत निघाला तेव्हा आबासाहेब गादीवर उठून बसायला लागले होते. त्याच्या मनात शंका नव्हती की काही दिवसातच ते पूर्ववत होतील. केवळ दृष्टीचा अभाव आहे म्हणून खचणारांपैकी ते नव्हतेच. महिन्याभरात पुन्हा एकदा यायचं कबूल करून चंदूने त्यांचा निरोप घेतला.

बरोबर महिन्याने रविवारला जोडून आलेल्या दोन सुट्यांचा फायदा घेऊन चंदू परत आबासाहेबांना भेटायला आला. आबासाहेबांची प्रकृती जरी बरीच सुधारली होती तरी अगदी पूर्वीसारखी झालीच नव्हती. अंधतेने आलेली कमतरता ते कशानेही भरून काढू शकत नव्हते. कितीही लपवायचा प्रयत्न केला तरी त्यांच्या हालचालीतली एक अस्वस्थता लपत नव्हती. त्यांना भेटायला येणारांची वर्दळही कमी झाल्यासारखी वाटली. रात्रीचं जेवण वगैरे झाल्यावर चंदू त्यांच्या खोलीत गेला. त्यांनीच त्याला बोलावलं होतं.

त्यांच्या आवडीची काही पुस्तकं त्यांनी चंदूला कपाटातून काढायला सांगितली आणि त्यातला काही भाग वाचून दाखवायला सांगितला. वाचता वाचता चंदू मधूनच त्यांच्याकडे पहात होता. सुरवातीस त्यांचं मजकुराकडे चांगलं लक्ष होतं पण काही वेळाने

चंदूच्या लक्षात आलं की ते पेंगत आहेत. आणि काही मिनिटातच त्याना गाढ झोप लागली. दिवा मालवून चंदू हलक्या पावलांनी खोलीतून निघून जायच्या बेतात होता, तोच त्याचं लक्ष आबासाहेबांच्या हाताकडे गेलं. त्यांचा उजवा हात, किंवा उजव्या हाताचं पहिलं बोट अंगावरच्या शालीवर काही अक्षरं गिरवीत असल्यासारखं हलत होतं. आबासाहेब गाढ झोपेत होते पण बोटाची हालचाल मात्र चाललीच होती. जन्मभराच्या लेखनाच्या सवयीचा हा परिणाम असला पाहिजे, खोलीबाहेर जाता जाता चंदूने मनाशी विचार केला.

दुसऱ्या रात्रीही आबासाहेबांनी चंदूला वाचायला बोलावलं. त्याची तयारीच होती. दिवसाचे सर्व तास कोणत्याना कोणत्या तरी कामात घालवणाऱ्या आबासाहेबांना आताची ही निष्क्रीयता किती असह्य होत असेल याची त्याला पूर्ण कल्पना होती. आपल्या एवढ्याशा मदतीने त्यांचे काही तास जर तितकेच जरा सुसह्य होत असतील तर त्याची अगदी मनापासून तयारी होती. वाचायला बसतानाच त्याची नजर सहजच त्यांच्या उजव्या हाताकडे गेली. काल जी गोष्ट त्याला दिसली नव्हती ती आज दिसली. आबासाहेबांनी डाव्या हाताने आपला उजवा हात घट धरून ठेवला होता. त्यावेळी त्याला याचा अर्थ समजला नाही.

चंदू पुस्तक वाचायला लागला. आबासाहेब कालच्यापेक्षा आज जास्त सावध दिसत होते, त्याच्या वाचण्याकडे त्यांचं खरोखरच लक्ष होतं. पण जरा वेळाने त्यांचं लक्ष भरकटत दुसरीकडे गेलं आणि कालच्याच प्रसंगाची पुनरावृत्ती झाली. ते गाढ झोपेत घोरत होते. पुस्तक हातात तसंच उघडं ठेवून चंदू त्यांच्याकडे पहात होता. उजव्या हातावरची डाव्या हाताची पकड आता सैल पडली होती. उजव्या हाताची बोटं वळवळ करायला लागली होती. हळुहळू उजवा हात मोकळा झाला आणि परत शालीवर अक्षरं गिरवायला लागला. ती अक्षरं काय होती हे चंदूला दिसत नव्हतं—समजा त्या हातात एक पेन्सील दिली तर ? त्याने आसपास पाहिलं. मोठ्या टेबलावर एक पॅड होतं आणि पेन्सीलही होती. त्याने पॅड हलकेच आबासाहेबांच्या उजव्या हाताखाली सरकावलं आणि पेन्सील त्या हातापाशी नेली. एक प्रकारच्या अधीर हावरेपणाने हाताने पेन्सिलीवर झडप घातली आणि बोटात पेन्सील धरून हात कागदावर लिहायला लागला. कॉटशेजारीच उभा राहून चंदू कागदावर उमटणारी अक्षरं वाचत होता.



चिखलफेक चालू आहे !

मोहळकर. मोहळकर. रा. शं. मोहळकर. आबासाहेब मोहळकर. आबा मोहळकर. रा. शं. मोहळकर. चंदू. चंद्रकांत. चंद्रकांत श्रीखंडे. चंदू. चंदू. मोहळकर. आबासाहेब मोहळकर. रा. शं. मोहळकर.

"तू आहेस तरी कोण ?" चंदूने हलकेच विचारलं.

पेन्सील जरा वेळ कागदावर विसावली व मग झरझर चालू लागली.

"तुला काय करायचंय त्याच्याशी ?"

"तू आबासाहेब आहेस का ?" चंदूने हलकेच विचारलं.

"आबासाहेब ! मी ? हा : हा : ! चंदू ! चंद्रकांत ! वा वा !"

अक्षरं वळणदार होती, सरळ रेषेत येत होती आणि पेन्सील कागदावर दाबून काढली होती. चंदूच्या मनाचा एकदम गोंधळ झाला होता. आणखी एक प्रयोग म्हणून त्याने त्या हातातली पेन्सील हलकेच काढून घेतली आणि त्याच कागदावर स्वतः लिहिली "आता किती वाजले आहेत ?" त्याचं लिहिणं होताच तो हात चाचपडत पुढे आला, चंदूने लिहिलेल्या ओळीवरून दोन–तीनदा फिरला आणि मग कागदावरची पेन्सील उचलून लिहू लागला :

"रात्रीचे दहा वाजून चौदा मिनिटं. आणि चंदू, आता पुरे. आपली ओळख झाली आहे. पण याबद्दल कोणाशी एक अवाक्षरही बोलू नकोस. आबासाहेबांशी तर एक शब्दही बोलू नकोस."

"कां ? त्याना याची कल्पना नाही ?" चंदू हलकेच म्हणाला.

"त्यांना ? हा: ! कोणालाच याची कल्पना नाहीय् !"

"म्हणून त्यांनी डाव्या हातात उजवा हात धरला होता तर !" चंदू म्हणाला.

"आता पुरे चंदू. पुन्हा आपली भेट होणारच आहे."

"कोठे ?" तो विचार फारसा न आवडून चंदू म्हणाला.

"कोठेही होईल ! जग काय इतकं मोठं आहे का ?"

"तरी पण कोठे भेटणार आपण ?"

"कोठे भेटणार नाही हे विचार, चंदू ! आता पुरे !" हाताची बोटं एकदम थकल्यासारखी ढिली पडली, पेन्सील गळून कागदावर पडली आणि मग घरंगळत खालच्या फरशीवर पडली. त्या







अनुक्रमणिका

आवाजाने आवासाहेबांना एकदम जाग आली. ते दचकून इकडे तिकडे पहात म्हणाले, "अरे ! मला झोप लागली होती वाटतं ? किती वेळ रे, चंदू ?"

"असेल पंधरावीस मिनिटं–" चंदू त्यांच्या हातांकडे पहात म्हणाला. जाग आल्यावरोबर त्यांनी उजवा हात परत एकदा डाव्या हातात घट्ट धरला होता. होत असलेल्या विलक्षण प्रकाराची त्यांना काहीतरी कल्पना आली असली पाहिजे.

"चंदू, आताशी मला मोठी चत्मकारिक स्वप्नं पडायला लागली आहेत बघ. कधी चमत्कारिक देवळं येतात. कधी खूप जुनी, पुरातन शहरं दिसतात इतके दिवस त्याच विषयांचा अभ्यास चालला आहे ना–तेच दिसत असणार !" ते वरपांगी सहजपणे वोलत होते खरे, पण त्यांच्या शब्दात अस्वस्थपणाची एक झाक होती." आणि आताच्या स्वप्नात तुझाही काहीतरी संबंध होता–आजवर असं कधी झालेलं आठवत नाही–" ते गप्प वसले.

"ही स्वप्नं किती दिवसापासून पडत आहेत तुम्हाला आवा-साहेब ?"

"दोन तीन महिने झाले–माझ्या आजारपणापासूनच सुरू झाली–" आवासाहेबांनी चेहऱ्यावरून एकदा हात फिरवला आणि एक मोठी जांभई दिली. ते अगदी थकलेले दिसत होते. चंदूने त्यांचा निरोप घेतला. पण त्या रात्री झोप लागेपर्यंत त्याला समोर आवा-साहेबांचा उजवा हात सारखा दिसत होता. ते झोपले की त्यांच्या हाताची पकड ढिली होईल किंवा उजवा हातच स्वतः त्या पकडीतून सोडवून स्वतःला मोकळा करील (ते काही त्याच्या पलिकडचं नव्हतं !) आणि मग त्यांची अक्षरं गिरवणं चालू होईल अनेक लोकांना अशा काही प्रतिक्षिप्त किंवा रिफ्लेक्स क्रियेच्या सवयी असतात हे त्याला माहीत होतं. . . . पण हा प्रकार काही वेगळाच वाटत होता. त्याने विचारलेले प्रश्न त्या त्या कोणाला ऐकू गेले होते ? कागदावरच्या ओळी त्याला वाचता आल्या होत्या सर्वांची नावं माहिती होती आणि उत्तरात किंवा विधानात एक प्रकारचा वेफिकीर उर्मटपणा होता हे सगळंच काहीतरी विपरीत वाटत होतं.

दुसऱ्या दिवशी दुपारी त्याला निघावं लागणार होतं. आवा-साहेबांची गाठ फक्त एकदाच सकाळी पडली. त्यांचा चेहरा त्याला ओढलेला आणि जरासा सचिंत दिसला. काल त्यांनी वरवर दाखवलं त्यापेक्षाही त्यांना आतून त्या प्रकाराची काळजी वाटत होती हे उघड होतं. त्याच वेळी खोलीत डॉक्टर आले आणि चंदू काही वेळ शेजारच्या खोलीत थांबला. त्या खोलीत आवासाहेबांनी आपली लायब्ररी ठेवली होती. चंदूला वाटलं आबासाहेबांच्यामागे (ते आता फार दिवसांचे सोबती नव्हते हे उघड दिसत होतं) या मौल्यवान पुस्तकांकडे कोणी ढुंकूनसुद्धा पहाणार नाही. त्याने सहज समोरच्या कपाटातली दोन तीन पुस्तकं काढून चाळून पाहिली. ती तो परत कपाटात ठेवून देण्याच्या बेतात होता तेव्हा त्याला ते दिसलं. एका पुस्तकाची शेवटची बरीच पानं मार्जिनमध्ये पेन्सीलीत लिहि-लेल्या बऱ्याच मजकुराने भरली होती. त्या काही टीपा किंवा संदर्भ नव्हते. त्यातली सुरुवातीची काही अक्षरं तर एखाद्या लहान मुलाने कित्ता काढावा तशी होती. आणि मग मात्र पानापानागणिक अक्षर सुधारत गेलं होतं—शेवटच्या पानावरचं अक्षर तर चंदूने तात्काळ ओळखलं. काल रात्रीच त्याने हे अक्षर पाहिलं होतं. अंध आवासाहेब झोपलेले असताना त्यांचा उजवा हात याच अक्षरात कागदावर भराभर ओळी लिहीत होता ! एकदम कसमचं वाटून चंदूने पुस्तक मिटले आणि घाईने कपाटात ठेवून दिले. निष्कर्ष उघड होता आवासाहेबांची दृष्टी अधू व्हायला लागली तेव्हापासून त्यांच्या उजव्या हातात ही चमत्कारिक शक्ती वावरायला लागली होती. वाचता वाचता त्यांना जरा डुलकी लागली की हा हात आपला लेख-नाचा सराव वाढवत होता. सुरुवातीस आवासाहेबांना खऱ्या प्रका-राची काहीच कल्पना नसणार. कपाटातलं पुस्तक पेन्सिलीने चितारून खराब केलं म्हणून ते घरातल्याच कोणावर तरी रागावले असतील त्यांना कल्पनाही नसेल की ही व्रात्य, धूर्त प्रेरणा त्यांच्याच शरीरात वास करीत होती !

डॉक्टर गेल्यावर चंदू आवासाहेबांच्या खोलीत गेला.

"काय रे, आज जाणार असशील ना ?"

"होय आवासाहेब आठ पंधरा दिवसांनी चक्कर मारीनच–"

"आता काही कशाची खात्री देता येत नाही, चंदू–"

"असं काय भलतंच वोलता, आवासाहेब ! तसं काही तुमचं दुखणं असाध्य नाही–तुम्ही तर खास बरे व्हाल यातून–"

"अरे, डोळे गेले की मग जगून तरी काय करायचं ? तसा मी खूप उभारी धरतो–पण आंधळेपणी जगायचं म्हणजे अगदी असहाय वाटतं बघ–" चेहऱ्यावरून हात फिरवायची त्यांना बरीच सवय लागलेली दिसली.

"सगळीकडे अंधार–दिवस कळत नाही, रात्र कळत नाही–डोळ्यासमोर सारखी चित्रं तरळत असतात–आता सगळीच खोटी, नाही का ?" त्यांच्या स्वरातली विफलता चंदूला प्रकर्षाने जाणवली. पण त्यातही भीतीची एक अस्पष्ट छटा होती. "चंदू जरा जवळ ये माझा उजवा हात बघ–त्यात काही कमी जास्त दिसतं का रे तुला ? आताशी जड जड वाटतो, मुंग्या आल्यासारख्या वाटतात–"

त्यांच्या या शब्दांनी मात्र चंदू मनातल्या मनात चरकला. जरा अनिच्छेनेच पुढे होऊन त्याने आवासाहेबांचा उजवा हात हातात घेतला. त्याच वेळी त्यांच्या डाव्या हाताकडेही पाहिलं. डाव्याच्या मानाने उजवा हात चांगलाच धष्टपुष्ट, नितळ, निरोगी दिसत होता. दोन हातातल्या या फरकावर विचार करायचीच त्याची इच्छा नव्हती. उजवा हात त्याने हातात घेताच त्या हाताची बोटं त्याच्या

(पृष्ठ ६० वर पहा)



अनुक्रमणिका




बिल अँडर्स



एखाद्या खराब समुद्र किनाऱ्यासारखा चंद्राचा मागचा पृष्ठभाग दिसत होता....हे वर्णन कवितेत शोभून दिसण्यासारखे नसले तरी वस्तुस्थितीच तशी असल्याने माझा अगदी नाईलाज झाला....

सादरकर्ते प्रा. रा. वि. सोवनी

प्रत्यक्ष प्रवासाला जाण्यापूर्वी आमचे जेव्हा प्रशिक्षण चालू होते तेव्हा माझे सहकारी मला "नवशिक्या" (रुकी) असे म्हणत. मला स्वतःला ही चेष्टा आवडत नसे परंतु हा माझा आयुष्यामधील पहिलाच अंतराळ प्रवास होता हे मात्र खरे. खरं म्हणजे सॅटर्न पाच अग्निबाणावर चंद्र प्रवासाला जाणारे इतर दोघेही प्रथमच इतक्या लांबवर जाणार होते. म्हणजेच तेही माझ्यासारखेच नवखे होते नाही का !

मी दीड वर्ष चांद्रयान चालविण्याचे शिक्षण घेत होतो. कारण चंद्र प्रवासाला जाणाऱ्या प्रवाशांपैकी माझ्यावर चांद्रयान चालविण्याची जबाबदारी होती. परंतु आम्ही फक्त चंद्राला प्रदक्षिणाच घालणार आहोत अशी योजना निश्चित झाली तेव्हा साहजिकच ते चांद्रयान आमच्याबरोबर येणारे नव्हते. आणि म्हणूनच माझा एकादा जवळचा मित्र हरविल्याप्रमाणे मला वाटले. चांद्रयान चालवावयाचे नाही तर मग ह्या प्रवासात मी काय करावयाचे ? घाईघाईने मी मला कोणते नवे काम देण्यात आले आहे ते माहीत करून घेतले. मुख्य अपोलो यानाची संपूर्ण माहिती करून घेणे हे माझे पहिले काम होते. यानातील विद्युत् शक्ती, हवामान नियंत्रण, प्रवासी यंत्रणा ह्या तीन घटकांवर लक्ष ठेवून त्यांचे योग्य ते नियंत्रण करणे व समजा त्यातील काहीत बिघाड झाल्यास काय करावयाचे हे ठरविणे अशी माझी कामे होती.

पृथ्वी भोवतालच्या भ्रमण कक्षेत आमचे यान शिरल्यावर माझ्यावर यानातील यंत्रणांची चाचणी करण्याची जबाबदारी होती. परंतु मी खरं सांगतो की इतर नवशिक्यांप्रमाणेच वारंवार गवाक्षांमधून डोकावण्याचे आकर्षण मलाही होते आणि मी तसे केलेसुद्धा.

भ्रमण कक्षेतून जेव्हा मी पृथ्वीकडे पाहिले तेव्हा पृथ्वीवरील पाणी, बेटे आणि खंड पाहून मी भारावून गेलो. ऑस्ट्रेलियात भडकत असलेला प्रचंड अग्निप्रलय मला दिसला, न्यूझीलंडवर चाललेला विजेचा खेळ मी पाहिला. मला ही दृश्ये नीट पाहावयाची होती परंतु आम्ही चंद्राच्या दिशेने निघालो होतो आणि त्यामुळे क्षणभर डोकावण्याखेरीज आम्हाला काहीच करता आले नाही. पृथ्वी भ्रमणात आणखी एक दोन दिवस राहिलो असतो तर ही दृश्ये पोटभर पाहून घेता आली असती.

चंद्रापर्यंतचा प्रवास कंटाळवाणा होता. भरपूर निद्रा घेणे ही आमची फार मोठी समस्या होती आणि ती सोडविण्यात मला व्यक्तिशः तरी फारसे यश मिळाले नाही.

अपोलो यान हे सभोवतालची दृश्ये पाहण्यासाठी तयार केलेच नव्हते. त्यातील पाच गवाक्षांमधून फारसे मोठे दृश्य दिसत नाही. साहजिकच ह्या पाचपैकी मोठ्या तीन गवाक्षांच्या काचा धुरकट झाल्या तेव्हा तर माझी फारच निराशा झाली. काचा धुरकटून जाण्याचा प्रश्न भावी प्रवासात येणार नाही; पण माझी खात्री आहे की चंद्रभूमीची छायाचित्रे घेण्यासाठी व तो पाहाण्यासाठी सर्कसच करावी लागेल. एखाद्या सुरेख व आकर्षक उद्यानातून शरमन रणगाड्यात बसून सहल करण्यासारखाच हा प्रकार आहे. यानाची उंचीही योग्य त्या परिस्थितीत कायम ठेवण्याची जबाबदारी आमच्यावर होती; कारण त्याशिवाय आम्हाला पृथ्वीशी संपर्क ठेवता आला नसता. आमचे अपोलो यान आम्ही त्याच्या उभ्या अक्षाभोवती एकसारखे गोलाकार फिरवीत होतो. त्यामुळे यानाच्या







सर्व बाजू सूर्याच्या प्रखर उष्णतेला व अंतराळाच्या शीत तपमानाला सारख्याच तोंड देत होत्या. एक तासाला एक गोलाकार फिरकी असा त्या यानाचा हळूवार वेग होता. पृथ्वीच्या बाजूकडे आमच्या यानाचे आकाशीय (अँटेना) सतत ठेवण्यासाठी यानाच्या उभ्या अक्षावर आम्हाला नेहमीच लक्ष ठेवून तो बरोबर दिशेत आहे हे पाहावे लागत असे. पृथ्वीसापेक्ष व सूर्यसापेक्ष अशा ह्या दोन्ही हालचाली करण्यासाठी आम्ही बहुधा डाव्या बाजूतच होतो आणि तेथूनच आम्ही प्रवास करताना गवाक्षांमधून पाहात होतो.

पृथ्वीपासून चंद्रापर्यंतच्या २ लक्ष ४० हजार मैलाच्या सर्व प्रवासात मी एकदाही वाटेत चंद्राचे दर्शन घेतले नाही ह्या घटनेचा खरंच माझ्या मनावर फार खोल परिणाम झाला.

चंद्राच्या भोवती पहिली प्रदक्षिणा घालण्यासाठी जेव्हा आम्ही एंजिन प्रज्ज्वलित केले त्यावेळी मला चंद्राची जाणीव झाली. त्याच्या आधी आमच्या यानाच्या गोलाकार स्वभ्रमण गतिमुळे दर तासाला सूर्याच्या विरुद्ध बाजूस असताना आम्हाला संध्याकाळ आणि रात्र ह्या अवस्थांचा अनुभव येत होता. सूर्याचा प्रकाश आणि पृथ्वीवरून परावर्तित झालेला प्रकाश ह्या दोहोमुळे चंद्राच्या सावलीचा जो भाग निच्छाय (अम्ब्रा) प्रदेश होता त्यात जेव्हा आमचे यान मागच्या टोकातून आत आले तेव्हा तर अंधार अधिकच दाट वाटला. त्यावेळी चंद्रावर फक्त ताऱ्यांचा अस्पष्ट प्रकाश पसरला होता. मी मानेला ताण देऊन बाहेर पाहाण्याचा प्रयत्न केला तेव्हा मला प्रत्यक्ष चंद्र दिसलाच नाही; पण काहीतरी मोठी, काळी आणि विशाल वस्तू आमचे 'मागे' तयार होत आहे ह्याची जाणीव होत होती. एका विशिष्ट रेषेपर्यंत मला आकाशातले तारे दिसत होते पण त्या रेषेच्या खाली असलेल्या काळ्या प्रचंड निर्गुण चकतीमुळे कोणतेही तारे दिसत नव्हते. ती एक मोठी चत्मकारिक भावना होती.

चंद्राभोवतालच्या प्रदक्षिणेत आम्हाला चंद्रापासून ७० मैल अंतरावर यावयाचे होते. चंद्राच्या पाठीमागे जेव्हा आम्ही जात होतो त्यावेळी आमचे आम्हीच होतो कारण त्यावेळी आमचा पृथ्वीशी संपर्क तुटत असे. तोपर्यंत (मागे जाईपर्यंत) आमचा पृथ्वीशी असलेला संपर्क इतका छान जुळला होता व आम्ही दोघांनी एकमेकाला चांगले परिचित करून घेतले होते. ठरलेल्या सेकंदाला जेव्हा आम्ही प्रथमच सूर्यप्रकाशात आलो तेव्हा आम्हाला फार आनंद झाला. चंद्रभूमीवरच्या उत्तुंग पर्वतांवर प्रकाशित असलेला तो सूर्य आम्ही पाहिला. चंद्रावर तो सूर्यास्त होता, पण आम्हाला तो सूर्योदय होता.

मला वाटले की विश्वामधल्या दुसऱ्या एखाद्या ग्रहाच्या निकृष्टीत सापडणारे आम्ही पहिले मानव होतो. पण त्याच बरोबर पृथ्वीच्या आकर्षणातून निसटून गेलेले व दुसऱ्याच ग्रहाच्या आकर्षणात 'पकडले' गेलेलेही आम्ही पहिलेच होतो.

चंद्रभ्रमणाच्या कक्षेत जाण्यासाठी आम्ही एंजिन प्रज्ज्वलित केले आणि नंतर माझे सारे शरीरच जणु नेत्रमय झाले. धूसर खिडकीच्या काचेला नाक चिकटवून मी जेवढे म्हणून पाहाणे शक्य होते तेवढे पाहाण्याचा प्रयत्न करीत होतो. एखाद्या अज्ञात स्थळाची पाहाणी केल्याची भावना तो चंद्राचा पृष्ठ भाग झपाट्याने फिरत असताना पाहून मला झाली. माझी अशी खात्री आहे की लेविस आणि क्लार्क, बिर्ड, हिलेरी आणि त्यांच्या सारख्या इतर प्रवाशांना, त्यांचे उद्दीष्ट गाठल्यावर असेच वाटले असेल. पृथ्वीवरील अनेक अज्ञात प्रदेश हुडकून काढणे, ते पाहाणे, ते जिंकणे ह्याच कक्षा मानवाच्या मनात आजपर्यंत होत्या. आता अंतराळ ही एक नवी कक्षा त्याच्या जीवनात आली होती आणि त्या अंतराळात जाणाऱ्या पहिल्या यानात मी होतो.

चंद्राभोवती भ्रमण करीत असताना चंद्रभूमीचे निरीक्षण करणे आणि छायाचित्रे घेणे ही माझी कामे होती. माझ्या मनात मी काय पाहाणार आहे ह्या संबंधीचे एक चित्र तयार झाले होते, पण मला आश्चर्याचे धक्के बसले. पृथ्वीसापेक्ष असलेला चंद्राचा पृष्ठभाग परिचित आहे. परंतु आजपर्यंत कोणाही मानवाने स्वतःच्या डोळ्यांनी न पाहिलेला चंद्राचा मागच्या बाजूचा पृष्ठभाग माझ्या कल्पनेपेक्षा वेगळाच होता. तो भाग एखाद्या युद्ध भूमीसारखा होता. खड्यांवर खड्डे, विवरांवर विवरे असा तो देखावा होता. त्या ठिकाणी टेकड्या, पर्वत, उंच सुळके, कडे असावेत अशी माझी अपेक्षा होती. पण तसे ते फारच थोडे होते. जिकडे तिकडे खड्डेच खड्डे होते. तो भाग आज युगानुयुगे उल्कांच्या माऱ्यात पार साफ होऊ गेला होता. मी जितके लक्षपूर्वक पाही तितके अधिकाधिक मोठे आणि विस्तृत होणारे खड्डे दिसत होते.

त्यावेळी माझ्या शब्दात केलेले वर्णन पृथ्वीवर पाठविले आणि त्या वर्णनामुळे काही कवींना मात्र राग आला. एखाद्या खराब समुद्र किनाऱ्यासारखा चंद्राचा तो मागचा पृष्ठ भाग दिसत होता असे मी म्हणालो होतो. हे वर्णन खासच कवितेसारखे नाही पण ते खरे मात्र आहे. व्हॉलीबॉलच्या समुद्र किनाऱ्यावरील मैदानावर उसळणाऱ्या धुळीप्रमाणे तो भाग फिरत होता. त्याचा रंग राखी पांढरा दिसला. सारा चंद्र कसा पिठासारखा सपाट आणि लाजाळू वाटला. उंचवटे कोठे नाहीतच जणु.

चंद्रभूमीच्या विकासाच्या इतिहासात मला विशेष रस वाटतो. त्याबद्दलचे ज्ञान पुष्कळच फायदेशीर ठरेल असा माझा विश्वास आहे. चंद्राचा पृष्ठ भाग जरी खराब झालेला असला तरी पृथ्वीच्या बदललेल्या पृष्ठ भागापेक्षा तो खूपच मूळच्या त्याच्या प्रकृतीजवळचा राहिला आहे. त्याचे विश्लेषण करणेही त्या मानाने सोपे आहे. त्याच्या इतिहासाच्या, रचनेच्या काही खुणा सापडतात का म्हणून मी त्या पृष्ठ भागाचे सूक्ष्म निरीक्षण करण्याचा प्रयत्न केला. मेंदूपेक्षा कॅमेरा एखादे चित्र उत्कृष्ट 'स्मृतीं'त ठेवू शकतो. पण आपले डोळे कॅमेऱ्यापेक्षा अधिक चांगले निरीक्षण

करू शकतात आणि छायाचित्रात न येणारा एखादा बारकावा ते निश्चित पाहू शकतात. त्या धूसर गवाक्षातून जेवढे पाहता येईल तेवढे पाहून कोठे लाव्हा रसाचा प्रवाह, ज्वालामुखी आणि इतर काही गोष्टी दिसतात की काय हे नोंदण्याचा प्रयत्न करीत होतो. चंद्राची पाठीमागची बाजू बहुतांशी उल्कापातामुळे अशी झाली असली तर तिच्या रचनेमधील काही भागाचा मागोवा ज्वालामुखीमधून बाहेर पडलेल्या लाव्हारसामुळे झाला असावा हे समजत होते. आम्ही घेतलेली छायाचित्रे व स्वतः पाहिलेली दृश्ये ह्यांचा मेळ घालून बऱ्याच प्रश्नांची उकल करता येईल.

पृथ्वीच्या प्रकाशात चंद्रावर किती आणि कसे दिसेल ह्याचे मला कुतुहल होते. पृथ्वीवरून चंद्र जितका प्रकाशित दिसतो त्याच्या आठपट प्रकाशित पृथ्वी चंद्रावरून दिसते. पृथ्वीवर पडलेला सूर्यप्रकाश चंद्रावर पडतो आणि पुन्हा परावर्तित होतो म्हणून चंद्र एवढा फिका दिसत असावा. पृथ्वीच्या प्रकाशात तुम्ही चंद्रावर उतरू शकणार नाही पण त्या प्रकाशात चंद्र-भूमीची बरीच स्पष्ट कल्पना खास येईल.

चंद्राचा प्रकाश परावर्तित करण्याचा गुण पृथ्वीपेक्षा भिन्न आहे. चंद्राच्या पूर्ण बिंबाकडे आपण पाहातो त्यावेळी त्याचा सर्व पृष्ठभाग प्रकाशित दिसतो. कोणत्याही कोनातून आलेले प्रकाश किरण त्याचा पृष्ठभाग उजळून टाकतात. हमरस्त्या-वरील एखाद्या प्रकाशित खुणेसारखा तो प्रकार असतो. परंतु पृथ्वी एखाद्या गोला-कार आरशाप्रमाणे प्रकाश परावर्तित करते. प्रकाश एखाद्या बिंदूवर पडून तेव-ढाच भाग प्रकाशित होतो. कडेला तो भाग अस्पष्ट होत जातो. हा मूलभूत फरक चंद्र व पृथ्वी ह्यांच्या प्रकाश परावर्तनात आहे. आम्ही घेतलेल्या छायाचित्रात असेच 'प्रकाशित बिंदू' दिसू शकतात.

ल्युनार ऑर्बिटर ह्या यांत्रिक बाल-चंद्राने काढलेली चंद्रभूमीची छायाचित्रे व त्यांच्यावर आधारित तयार केलेले नकाशे अशा दोन्ही गोष्टी आमच्या बरोबर होत्या. पृथ्वीसापेक्ष चंद्र पृष्ठाचे नकाशे अचुक आहेत. पण पाठीमागच्या भागाचे नकाशे तितके बरोबर नाहीत. ज्या विशिष्ट पातळीतून ती छायाचित्रे ऑर्बिटरने घेतली होती त्यामुळे ते अचुक नव्हते. नकाशे तयार करणाऱ्या तज्ज्ञांनी हे आम्हाला सांगितले होते व त्यामुळे १६० (नॉटिकल) मैलांचा फरक पडेल असेही मत त्यांनी व्यक्त केले होते. त्यांनी आपल्याकडून पराकाष्ठा करून सुरेख नकाशे बनविलेले होते. चंद्रभूमीपासून ६० मैलावरून जेव्हा तुम्ही पाहता त्यावेळी नकाशामधील एखादे स्थळ त्या जागेपासून १६० मैलावर असेल हे तुम्ही समजू शकता. पाठीमागच्या पृष्ठ-भागाच्या नकाशावर आमचा मार्ग आख-ताना आम्हाला थोडीशी अडचण आली.

म्हणूनच आमच्या मार्गाचे सतत छाया-चित्रण करणे हे महत्त्वाचे काम होते. छाया-चित्रांच्या साहाय्याने नकाशे तयार कर-णारे तज्ज्ञ आता अचुक नकाशे तयार करू शकतील.

ह्या सर्वांचा अर्थ एकच. तुमच्या जवळ जितके चांगले नकाशे असतील तितके नेमक्या जागी तुम्ही येण्याचा संभव अधिक. खरोखरी आमचा प्रवास हा त्यासाठीच होता. भावी प्रवाशांना आपले स्थान सापडण्यास व इतर प्रयोग करण्यास त्यामुळे सोयीचे होणार आहे.

घरी परत आल्यापासून साऱ्या जगातून मला येणाऱ्या पत्रांमुळे मी आश्चर्यचकित झालो आहे. साऱ्या जगाने आमच्या प्रवा-सात एवढा रस घेतला त्याबद्दल मी कृतज्ञ आहे. नवे शोधावे, नवे पहावे अशी इच्छा असणारे अनेक लोक जगात असले पाहिजेत. ख्रिसमसच्या आधीच्या दिवशी जे आम्ही संदेश पाठविले त्यासंबंधीची काही पत्रे आहेत. आम्ही सर्वांनीच त्याबद्दल आधीच विचार केला होता, पण मी मात्र व्यक्तिशः माझे मत बदलले. नाताळचा सण आणि ख्रिश्चन धर्म ह्या संबंधीच फक्त आपण बोलावे असे मला प्रथम वाटले. परंतु आम्ही जेव्हा तो विश्वाचा प्रचंड विस्तार पाहिला तेव्हा कोणत्याही धर्माशी संबंधित नसलेला पण जो पृथ्वीवरच्या साऱ्या मानव जातीला संबंधित असेल असाच संदेश पाठविण्याचे ठरविले. म्हणून विश्वाच्या उत्पत्तीबद्दल आम्ही त्यावेळी बोललो. खरं म्हणजे ही कल्पना फ्रॅंक बोर्मनची होती व तिच्याशी मी संपूर्ण सहमत होतो. आमच्या संदेशाला पाठिंबा देणारी बहुतांशी पत्रे मला येत आहेत.

देशभक्तीपर अशीही अनेक पत्रे आहेत आणि त्याचा मला अतिशय आनंद होतो. स्वदेशावर प्रेम करणे किंवा त्याचा अभि-मान बाळगणे ही काही भयानक गोष्ट नव्हे. विश्वास आणि ध्येय असण्यातही काय चूक आहे? ह्या गोष्टींचा अभिमान असल्याचे सांगण्याची आपण टाळाटाळ करतो. "हा प्रवास करण्याचे धैर्य तुम्ही कसे मिळविलेत?" असाही प्रश्न पत्रातून विचारला गेला आहे. मी त्याच्यावर विचार केला. स्वविश्वास आणि माझ्यावरील कौटुंबिक विश्वास ह्यांची मी त्या प्रवा-साच्या आपल्या देशाच्या मूल्यावरोबर तुलना केली. मला वाटते की त्या प्रवासा-मुळे फायदाच होईल आणि अनुभवाने अधिक साहस करणे शक्य होईल. ह्या सर्व गोष्टीत मी असण्याचे सुदैव व अभिमान वाटतो.

• • •





अनुक्रमणिका

## मानवी मनातील आंदोलनांचे सूक्ष्म चित्रण

गेल्या दशकामध्ये ज्या काही मोजक्या तरुण लेखक मंडळींनी आपल्या वैशिष्ट्यपूर्ण साहित्य निर्मितीने मराठी रसिक वाचकांची मने काबीज केली आहेत त्यांच्यामध्ये श्री. वसंत गोविंद देशमुख यांचा समावेश होतो. आतापर्यंत अनेक विनोदी लेख, कथा, काही नाटके आणि छोटयामोठ्या पाच-सहा कादंबऱ्या, या ललित साहित्यातील विविध प्रकाराचा त्यांच्या लेखणीने परामर्श घेतलेला आहे. त्यांच्या काही कलाकृती गुणवत्तेच्या दृष्टीने लक्षात घेण्यासारख्या उतरल्या आहेत.

देशमुख ज्या समाजामध्ये वावरतात त्यातील व्यक्तींच्या श्रद्धा, त्यांची स्वप्ने, त्यांची छोटी-मोठी सुख:दुखे आणि आशाआकांक्षा यांच्याकडे ते डोळसपणे पाहतात. त्यांचे कलात्मक मन या सर्व गोष्टीचा अन्वयार्थ लावण्याची धडपड करते. त्या बाबतीत त्यांच्या 'इथेचि जन्मली वेदना' कादंबरीमध्ये काही ठिकाणी त्यांना यश मिळाले आहे तर काही ठिकाणी ते अयशस्वी झाले आहेत. या छोटया कादंबरीमध्ये विराट घडामोडी नसल्या तरी मानवी मनातील आंदोलनांचे सूक्ष्म चित्रण लेखकाने उत्कृष्टपणे केले आहे.

'इथेचि जन्मली वेदना' याचे कथानक तसे फारसे गुंतागुंतीचे नाही. अत्तराचा पिढीजात धंदा करणारे अप्पा सुगंधे हे एक विधुर वृद्ध गृहस्थ असून त्यांना दोन सुंदर मुली असतात. त्यांच्या व्यवसायाला योग्य अशी त्यांनी त्यांची अनुक्रमे कस्तुरी व गंधा अशी नावे ठवली होती. केवडा कधी घरात जन्मलाच नाही. कस्तुरी तत्वज्ञान विषयाची पी. एच्. डी. घेण्याच्या विचारात असते तर गंधा मराठी विषय घेऊन बी. ए. झालेली असते. पुष्कळ वर्षांनी अप्पांना त्यांचे नाना नांवाचे मित्र भेटतात. त्यांचा एम्. ए. झालेला अविनाश नांवाचा मुलगा आणि गंधा हे एकमेकांवर अनुरक्त होतात. विवाहाचा मुहूर्त ठरतो. इतक्यात या तरुण युगलाच्या जीवनावर वज्राघात होतो. कारण एकाएकी गंधेच्या पोटामध्ये




**इथेचि जन्मली वेदना ● एका क्षणाची पक्षी**

कॅन्सर रोग वळावतो. तिच्या पोटदुखीचा प्रथम विपर्यास केला जातो पण नंतर कटु सत्य सर्वांना समजते. अखेरीस कस्तुरीचा हात अविनाशाच्या हाती देऊन गंधा अत्तराच्या सुगंधाप्रमाणे अनंतात विलीन होते. असे या कादंबरीचे थोडक्यात कथानक आहे.

कादंबरीतील स्वभावचित्रण म्हणजे कादंबरीचा आत्मा होय. या कादंबरीतील तीन स्त्रियांच्या स्वभावाच्या तीन परी लेखकाने अत्यंत कुशलतेने रेखाटल्या आहेत. ही कादंबरी नायिकाप्रधान आहे. कारण अविनाशपेक्षा कृतिप्रधान व्यक्तिचित्र गंधेचे आहे, बंडखोर प्रौढ कुमारिका कस्तुरी आणि त्या बहिणींची मावशी या जुन्या पिढीतील वृद्धेचे आहे.

"लग्न म्हणजे जातिवंत तडजोड; जीवन म्हणजे तडजोड ती कर ग पोरी" असे कस्तुरीला जिव्हाळयाने आणि आईच्या मायेने सांगणारी भोळीभाबडी जुन्या पिढीतील वृद्धा—क्षणमात्र मनाचा वेध घेते. गंधा आणि कस्तुरी या दोन बहिणींच्या मनोधारणेतील वेगळेपण लेखकाने फारच चांगल्या तऱ्हेने दर्शविले आहे. डेलीयाच्या फुलांकडे आणि आकाशातील ताऱ्यांकडे पाहून जांबाची कल्पना करणारी स्वप्नाळू गंधा आणि "स्त्री म्हणून जन्माला येणं—त्यातून हिंदुस्तानात आणि त्यातून हिंदू धर्मात" अशी आत्मवंचना करून घेणारी त्याचप्रमाणे अंतःकरणातील पुरुष सहवासाची व संसाराची सहज भावना अट्टाहासाने दडपून टाकून त्याबद्दल दुसऱ्यावर चिडणारी कस्तुरी या दोघीतला विरोध लक्षात घेण्यासारखा आहे. स्वतःच्या मनातील भावना दडपून टाकण्याचा वृथा प्रयत्न करताना कस्तुरीने 'वर पाहिजे' म्हणून वत्तपत्रात जाहीरात दिली आणि विमा एजंट मधुकर, लग्नमंजीतील जेवणाची कंत्राटे घेणारा बुंदीराम बनारसे आणि डास मारायचे औषध विकणारा चतुर भृंगराज राजहंस या तीन विदुषकी थाटाच्या तरुणांना भेटीला बोलावून तडफडणाऱ्या मनाचे जे प्रदर्शन केले आहे त्यावरून तिच्या मानसिक संघर्षाची सत्य कल्पना येते.

पुरुष पात्रांपैकी अविनाश हा कादंबरीचा कृतिशून्य नायक आहे. नायिका व उपनायिका यांची पात्रे रंगविण्यात गर्क झालेल्या लेखकाने बिचाऱ्या अविनाशकडे फारसे लक्ष दिलेले दिसत नाही. खोबरेकोथिंबीर पेरलेले पोहे खावे, गंधाबरोबर चांदण्याकडे पहात बसणे, डेलियाच्या फुलाने केलेल्या 'टाटा'ला प्रत्युत्तर देणे आणि गंधा वेदनेने तळमळत असता डॉक्टरकडे धाव न घता निर्बुद्धपणे तिच्या पाठीवर हात फिरवीत बसून तिच्या व त्याच्यासंबंधी अप्रबुद्ध बुद्धीने केलेला व चारित्र्यावर शितोडे उडविणारा खोटा आरोप मुकाटयाने गिळणे या पलिकडे अविनाश सबंध कादंबरीत काहीच कार्य करीत नाही. गंधा हे साध्य आणि अविनाश हे साधन असा लेखकाच्या मनातील हेतू असावा असे याबद्दल समर्थन करता यईल कदाचित् !

अप्पा आणि तात्या या दुकलीची व्यक्तिचित्रे अतिशय मनोहारी आणि वेल्हाळ उतरली आहेत. हे दोघे वृद्ध, प्रेमळ, संतृप्त आणि व्यवहारवादी युगात अद्वितीय शुद्ध मित्रप्रेमाची जपणूक करणारे. अप्पाने





अनुक्रमणिका

आयुष्यभर सर्वांचे चांगले केलेले, जुन्या पिढीतील असूनही त्यांनी मुलींना उच्च शिक्षण दिले. आईवेगळ्या मुलींवर अपार माया केली. त्यांच्या बुद्धिमत्तेचा अभिमान बाळगला. प्रथम पत्नीचा अंत झाल्यावर लग्नाचे वय असूनही केवळ मुलींना त्रास होईल म्हणून दुसरे लग्न केले नाही. अशा या प्रेमळ अप्पांना जेव्हा गंधाच्या पोटदुखीला विकृत स्वरुप देऊन कस्तुरी कटु बातमी देते तेव्हा त्यांच्या मनातील वेदनेला सीमा राहिली नाही. वार्धक्यात सचोटीने व्यवहार करून पांडुरंगाचे नाव घेत जीवन कंठलं आणि त्याबद्दल जी उलट शिक्षा मिळाली त्याने ते व्यथित होतात. चिपळ्या वाजवीत हरिनाम घेणाऱ्या अविनाशच्या प्रेमळ पित्याचे— नानांचे चित्रही असेच आल्हादक रंगविले आहे. हे दोघे वृद्ध आणि अप्पाच्या दुकानात अनेक वर्षे प्रामाणिकपणे नोकरी करून इमानावर जगणारे, उंच, गोरटेले, मळकट कपडे घालणारे, आकड्यातील चूक काढायला तहानलेले आणि आधुनिक प्रेमाबद्दल नाराज असणारे बापू बारटक्के या गौणपात्राचे स्वभाव चित्रही लेखकाने अचूकपणे रेखाटले आहे. याखेरीज मधुकर, चतुर आणि बुंदीराम ही विदूषकी थाटाची तीन पात्रे केवळ विनोद निर्मितीसाठी घातली असावीत. परंतु लेखकाचा हा हेतू फारसा सफल झालेला दिसत नाही. एक गोष्ट मात्र लक्षात घ्यावी लागते आणि ती म्हणजे मुळातच कादंबरीचे स्वरुप संक्षिप्त असल्यामुळे व्यक्तिदर्शनात असावा तेवढा गहिरेपणा दिसत नाही.

या कादंबरीमध्ये एकदोन बाबतीत अनवधानाने काही प्रश्नांचे स्पष्टीकरण करावयाचे राहिले आहे. उदाहरणार्थ, गंधाच्या पोटात कॅन्सर वळावतो त्याचे एकदम उग्र स्वरूप दाखविले आहे. आधीच्या प्रकरणातून त्याची थोडीशी चाहूल दर्शविली असती तर बरे झाले असते. तसेच मेघा आणि अविनाश यांच्या प्रणयाराधनेच्या काळाची सुस्पष्ट कल्पना करून दिलेली नसल्यामुळे गंधाच्या पोटदुखीचा जो विपर्यास केला आहे त्याबद्दल गोंधळ होतो. शिवाय ती खरोखर गरोदर आहे किंवा नाही याचा अनुभवी मावशीबाईना सुद्धा अंदाज करता येऊ नये अगर अविचाराने गर्भपातापर्यंत मजल जावी हे थोडेसे चमत्कारिक वाटते. हा प्रसंग न आणता कर्करोगाने निर्माण केलेल्या परिस्थितीला अधिक गहिरे करून करुणरसाचा उठाव केला असता तर बरे झाले असते असा एक विचार मनाला स्पर्श करून जातो. लग्नाळलेली मुलगी, वाघनखाचा फवारा, निरंतन कलश अशा सारखे बनविलेले शब्द ही कादंबरी वाचताना खटकतात.

तथापि या कादंबरीच्या शीर्षकामध्ये जो अर्थ अभिप्रेत आहे त्याची दुहेरी वीण पाहून त्यात स्वतःला हरवून गेलेल्या वाचकांना वरील उणीवांचे स्मरणही राहत नाही. या कादंबरीतील खरी वेदना आहे ती कस्तुरीसारख्या धसमुसळ्या आणि ध्येयाच्या भ्रामक मृगजळामागे धावत जाणाऱ्या प्रौढ कुमारिकेची ! या आंतरिक वेदनेतून आणि वैफल्याच्या भावनेतून सबंध कादंबरीत तिच्या मनाचा जळफळाट आणि असीम वेदना दाखविण्याचा लेखकाचा प्रयत्न चांगल्या तऱ्हेने सिद्धीला गेला आहे.

**—प्रा. सौ. चारुशीला गुप्ते**

('इथेचि जन्मली वेदना' लेखक : **श्री. वसंत देशमुख**, भारतीय प्रकाशन मंदिर, मुंबई-४; मूल्य चार रुपये.)

## जिद्दी आचाऱ्याचे साहस

श्री. **प्र. द. मराठे** यांची ही पहिलीच कादंबरी. या कादंबरीत एका सामान्य आचाऱ्याचे जीवन चित्रित केलेले आहे. बापू नावाचा एक साधासुधा गरीब ब्राम्हण तरुण आचारी. त्याचे मंजुळा नांवाच्या एका सालस आणि शीलवान् मराठा तरुणीवर प्रेम असते. त्यापूर्वी विवाह झाल्यावर चार महिन्यातच मंजुळेचा क्रांतिकारक पती गंगाराम देशसेवेसाठी परागंदा होतो. समाजाने बहिष्कृत केले असताही, बापू तिला आपल्या घरी रखेली म्हणून ठेवतो. तिच्यावर जीवापाड प्रेम करतो. या प्रेम-संबंधातून त्याला संजय नांवाचा मुलगाही होतो. उष्णतेच्या सतत सान्निध्याने बापूच्या त्वचेवर तांबडे डाग पडतात. लोक त्याला महारोगी ठरवितात. तो त्याची गुप्तता राखण्याची पराकाष्ठा करतो; परंतु एका लग्नाच्या वेळी त्याचे हे 'रहस्य' यजमानाला कळून चुकते. तो त्याच्या थोबाडीत मारतो. त्यामुळे अपमानित झालेला बापू आपले व्यंग घालवून पुन्हा प्रतिष्ठित समाजात स्थान मिळावे म्हणून उपाय शोधण्यासाठी जिद्दीने साधूचा वेष परिधान करून भारतभर भ्रमंती करतो व औषधाच्या शोधासाठी दिल्लीच्या एका फकीराकडे जातो. फकीराला महारोगावरील औषध माहीत असते. सर्व प्रवास तो रेल्वेतून फुकट करतो. प्रसंगी तिकीट तपासनीसाला मारूनही सुटका करून घेतो. अशाच एका प्रसंगी लालू नामक गुंडाला वाचविल्यामुळे त्याची दोस्ती होते. लालू हा रेल्वेतील माल फोडणारा व तो माल लंपास करून त्यावर उपजीविका करणारा मवाली असतो. बापू त्याच्याबरोबर गयेला जातो. धर्मशाळेत उतरतो. त्या ठिकाणी स्वार्थसाधु लफंग्या साधूच्या टोळीने चालविलेले अनन्वित अत्याचार त्याला पहायला सापडतात. जगनबाबा नावाच्या सच्छील साधूच्या आग्रहावरून तो गंगेत दररोज रात्रौ तीन वेळा सतत तीन महिने स्नान करतो व त्याच्या अंगावरील डाग नाहीसे होतात. त्याच्या मनीचे शल्य नाहीसे होते. याच प्रवासात मंजुळेचा परागंदा क्रांतिकारक पती गंगाराम याच्याशी त्याचा अकस्मात् परिचय होतो. परंतु त्याच्यापासून आपल्या नावाची गुप्तता राखून तो साधुवेष टाकून पुन्हा घरी पुण्याला परत येतो. त्यावेळी त्याचा पोलीस खात्यात असलेला मुलगा संजय मृत्यु पावलेला असतो व त्याची प्रेयसी मंजुळा प्रियकराच्या चिरवियोगामुळे व मुलाच्या अकाली निधनाने वेडी होऊन घर सोडून गेलेली असते. तो पुन्हा अगतिक होतो. ज्या सुखासाठी त्याने भगीरथ प्रयत्न केले ते सुख व समाधान अप्राप्य असल्याने तो पुन्हा बेचैन होतो

व त्या स्थितीतच पुन्हा प्रवासाला निघतो. दुःखाच्या जबरदस्त आघातामुळे गाडीतच त्याला मृत्यु येतो. असे हे सामान्य माणसाच्या जीवनाचे कथानक. त्यात शृंगार नाही की, हास्य पिकविणारा खुसखुशीत विनोदही नाही. यात आहे समाजाने जीवनातून उठविलेल्या एका सामान्य माणसाने अनुभविलेल्या जीवनाचे चित्रण.

बापूच्या या भारत-भ्रमंतीत त्याला आलेले अनुभव व त्यातील नाटच लेखकाने रंगविले आहे. बापू प्रवासात रेल्वेच्या पहिल्या वर्गातून विनातिकिट प्रवास करतो. क्वचित् एखादेवेळी पकडला जातो. पण कुबडीच्या प्रहाराने तिकिट-तपासनीसाला तो मूर्च्छित करतो, व आपली सुटका करून घेतो. देवळातील एका खऱ्याखुऱ्या साधूला त्याचा संशय येताच पुन्हा तो वरील उपाय योजून त्याला मूर्च्छित करतो. मदतीला धावत येणाऱ्या गुरवालाही तो कुबडीचा प्रसाद देतो. परंतु कधीही नि कुठेही तो पकडला जात नाही. ह्या घटना असंभाव्य वाटतात. गयेच्या देवळात रात्रीच्या वेळी स्वतःच्या मनःशांतीसाठी नियमित येणारी महाराष्ट्रीय स्त्री हिचा कथावस्तूशी संबंध कोणता? त्यातून लेखकाला काय सांगायचे आहे, हे स्पष्ट होत नाही. बापूच्या शोकांतिकेला कारण कोण? समाज की नियती? लेखकाच्या शब्दात सांगावयाचे तर 'आपण प्रत्येकजण एक क्षणाचा पक्षी आहोत. ईश्वराची निर्मितीच तशी आहे!'

मंजुळेच्या पतीच्या रूपाने लेखकाला स्वातंत्र्य-लढ्यात स्वतःचे जीवन वरबाद करणाऱ्या क्रांतिकारकांच्या जीवनाचे चित्रण करण्याचा उद्देश असावा. परंतु हा क्रांतिकारक आता स्वातंत्र्य मिळाल्यावरही गुप्त कां आहे? त्याचे मनीचे शल्य हे मंजुळेच्या प्रेमभंगाचे की स्वतंत्र भारतात आपली उपेक्षा झाली म्हणून? देशासाठी फकिरी पत्करणारा हा माणूस मंजुळेच्या प्रेमभंगाने व्यथित होतो. आपल्या प्रेमभंगाची ही वाहती जखम तब्बल बारा वर्षे तो जीवापाड जपतो. त्यातून विव्हल होतो व अखेर शेवटी आपल्या पत्नीने बापूशी प्रेमसंबंध जोडलेला कळताच संन्यासी होऊन महाराष्ट्रात परत येतो. गंगारामची ही व्यक्तिरेखा वाचकाच्या मनावर परिणाम करू शकत नाही. स्वतःच्या स्वार्थासाठी भगवी वस्त्रे परिधान करून भोळ्या-भावड्या, अंधश्रद्धेवर जगणाऱ्या यात्रेकरूंना लुबाडणारी स्वार्थी, क्रूर साधूंची टोळी आणि त्या सर्वांचा फरशीने खून करणारा लालू यांचे चित्रणही भडक व वरेचसे ठरीव ठशाचे वाटते. ही कादंबरी वाचत असताना लेखकाचा नवशिकेपणा जाणवतो, त्याच्या अभिव्यक्तीतील कच्चेपणा व मर्यादा जाणवतात. भडक व असंभाव्य प्रसंगाच्या चित्रणाने सर्वसामान्य वाचकाचे मनोरंजन होत असले तरी सामान्य माणसाच्या जीवनातील असामान्यत्वाचे चित्रण करण्याची कुवत नसल्यामुळे चोखंदळ वाचकाचे समाधान होऊ शकत नाही. पण एका वेगळ्या जीवनाचे चित्रण करणारी ही कादंबरी सर्वसामान्य वाचकाला आवडावी.

— **प्रा. अविनाश केळकर**

(**एका क्षणाचा पक्षी**:–लेखक **प्र. द. मराठे**, प्रकाशक ग. वा. नेवाळकर, संचालक, प्रकाशनविभाग, भारतीय ग्रंथ-भवन, दादर, मुंबई–१४, पृष्ठे १५८, किंमत पाच रुपये)

## यंदा कादंबरी स्पर्धा नाही, पण लेखकांसाठी खास स्पर्धा आहेच !

### पंचविसाव्या दिवाळी अंकासाठी

# विनोदी साहित्य स्पर्धा

### भरपूर रकमांची रोख बक्षिसे पुढील अंकात पहा !

**'दीपावली'च्या १९६९ च्या दिवाळी अंकासाठी आम्ही खालील योजना सहर्ष सादर करीत आहो**

- विनोदी साहित्याला विषयाचे कोणतेही बंधन नाही.
- साहित्य स्वतंत्र असले पाहिजे; अनुवाद, रूपांतर नको.
- कवितांचा विचार केला जाणार नाही. कविता पाठवू नयेत.
- परीक्षकांचा निर्णय अंतिम राहील. एखाद्या क्रमांकाला योग्य असे साहित्य न आल्यास ते पारितोषिक रद्द करण्याचा अगर विभागून देण्याचा अधिकार परीक्षकांचा राहील.
- परीक्षकांचा निर्णय दिवाळी अंकात जाहीर होईल आणि पारितोषिके मिळालेले साहित्य दिवाळी अंकातच प्रसिद्ध होईल.
- साहित्य दोन ते तीन हजार शब्दसंख्येच्या मर्यादेतच असले पाहिजे.
- साहित्य पाठविण्याची अखेरची मुदत दि. २० सप्टेंबर १९६९ ही आहे. गेल्या वर्षी कादंबरी स्पर्धेची मुदत वाढवून मिळण्यासाठी अनेकांनी कळविले होते, पण मुदतवाढ झाली नाही हे स्पर्धकांनी अवश्य ध्यानी घ्यावे.
- नापसंत साहित्य परत पाहिजे असल्यास सोबत पुरेसे पोस्टेज पाठवावे.


अनुक्रमणिका



—ज्ञानेश्वर नाडकर्णी

## दोन नवीन चित्रालये

गेल्या एक दोन महिन्यात मुंबईत दोन नवीन चित्रालयांची (आर्ट गॅलरीज) भर पडलेली आहे. लेडी जमशेटजी रोडवरील आपल्या कचेरीला जोडून 'कॅमलिन' या व्यापारी संस्थेने 'गॅलरी ओयासिस' नांवाचे छोटेसे चित्रालय सुरू केलेले आहे, तर 'ठॅकर' या व्यापारी संस्थेने रॅम्पार्ट रोवरील आपल्या कचेरीला जोडून 'गॅलरी रॅम्पार्ट' नांवाचे चित्रालय उघडलेले आहे.

उत्तर मुंबईत अस्तित्वात अलेले 'गॅलरी ओयासिस' हे एकमेव चित्रालय आहे. त्यामुळे दादर-माहीम विभागात राहणाऱ्या रसिकांची फार मोठी सोय झालेली आहे. 'कॅमलिन' ही चित्रकलेचे विविध साहित्य बनविणारी कंपनी. तिचे संचालक महाराष्ट्रीयच आहेत. चित्रालय सुरू करणारे ते एकमेव महाराष्ट्रीय असावेत ! उत्तर मुंबईच्या कलाविषयक रखरखाटात फुललेली ही चित्ररूपी हिरवळ 'ओयासिस' या नांवाने ओळखली जावी यात मोठे औचित्य आहे; कारण दक्षिण मुंबईला, विशेषतः काळ्या घोड्याच्या परिसराला चित्रालयांचे दुर्भिक्ष्य माहीत नाही.

आतापर्यंत 'गॅलरी ओयासिस'मध्ये सहासात चित्रकारांचे मिळून एक अशी तीन प्रदर्शने भरविण्यात आली. त्यात मांडलेल्या चित्रांचा दर्जा चांगला होता. प्रफुल्ला डहाणूकर, प्रसन्न, प्रभाकर बर्वे, श्रीनिवास मुडर्येश्वर, बद्री नारायण यांच्यासारख्या प्रथितयश व नवोदित चित्रकारांच्या कृती या प्रदर्शनांतून दिसल्या. दादर-माहीमच्या नागरिकांनी या प्रदर्शनांना कोणत्या प्रमाणात प्रतिसाद दिला हे मला माहीत नाही; परंतु मध्यमवर्गीय वस्तीत अत्यंत सोयिस्कर जागी असलेले मुंबईतील हे एकमेव चित्रालय आहे, आणि त्या दृष्टीने ते लोकप्रिय ठरावयास हरकत नाही.

'ठॅकर' कंपनीचा मूळचा धंदा पुस्तकविक्रीचा आणि पुस्तक प्रकाशनाचा. आपल्या अत्यंत दिमाखदार अशा दुकानाच्या पोटमाळ्यावर कंपनीने अत्याधुनिक सजावट लाभलेले एक वातानुकुलीत चित्रालय सुरू करावे ही एक स्पृहणीय घटना आहे.

'गॅलरी रॅम्पार्ट'चे उद्घाटन वासुदेव गायतोंडे यांच्या चित्रांच्या प्रदर्शनाने झाले. 'अॅवस्ट्रॅक्ट' चित्रकारांत गायतोंडे यांचे स्थान फार वरचे आहे. गेली काही वर्षे ते सातत्याने एकाच दिशेने प्रवास करीत आहेत. त्यांच्या चित्रांचे वर्णन करणे कठीण आहे. किंबहुना त्यात मानवी अगर निसर्गनिर्मित आकार दिसत नसल्यामुळे अशा आकारांच्या संदर्भात त्यांच्याविषयी बोलता येत नाही.

कोणत्या तरी एकाच रंगात प्रथम गायतोंडे आपला, मोठ्या आकाराचा चित्रफलक भरून टाकतात. या रंगाचे लेपन त्या फलकावर कमीअधिक जाडीने होते, आणि तो पारदर्शक तरी वाटतो किंवा माफकपणे तकाकत तरी राहतो. या रंगाच्या समुद्रात मग अन्य रंगांचे तरंग उठतात. बहुधा पांढऱ्या अगर तत्सम फिकट रंगाने फलकावर शैलीदार "ओरखडे" काढले जातात. जणु एखादी अज्ञात, लपेटदार लिपीच आपले सौंदर्य त्या फलकावर साकार करीत आहे असे वाटते.

मूळ रंग आणि या चित्रविचित्र खुणा यांच्यातील खुबीदार, कलात्मक विरोध हे गायतोंडे यांच्या चित्राचे सर्वसाधारण दृश्यतत्व. काही चित्रांना ते किंचित् वेगळ्या प्रकारे पोत देतात. उदाहरणार्थ, त्यांचे एक चित्र एखाद्या बोटीच्या गंजलेल्या पोलादी पत्र्यासारखे वाटत होते, तर काही लहान आकारांच्या चित्रफलकांवर गडद निळ्या प्रकाशात रात्रीच्या दिव्यांची चमचम दिसावी तसा परिणाम साधलेला होता.

चित्रफलकावर मुक्तपणे रेखाटलेले काही आकार एखाद्या काल्पनिक दृश्याचीसुद्धा हुलकावणी देतात. काही आकार वाळूत रुतून राहिलेल्या अवशेषांप्रमाणे तर काही समुद्रात फुटून इतस्ततः झालेल्या एखाद्या गलबताच्या डोलकाठ्यांप्रमाणे दिसतात.

आपल्या नेहमीच्या परिचयातील दृश्ये अगर वस्तू या चित्रांत दिसत नसल्या तरी ती अत्यंत काव्यात्म वाटतात. दुसरे असे की त्यांच्या जडणघडणीत एक आगळाच एकसंधपणासुद्धा प्रत्ययाला येतो; जणु सबंध चित्र हाच एक उत्स्फूर्त काव्यात्म उद्गार असावा ! दृष्टीला भुरळ पाडणाऱ्या या 'अॅवस्ट्रॅक्ट' चित्रांचे मुख्य कार्य म्हणजे एक 'मूड' निर्माण करून आपल्या चित्तवृत्ती तल्लीन करणे ! श्रेष्ठ चित्रकलेचा दुसरा काय हेतू असतो ?

गायतोंडे यांच्या प्रदर्शनापाठोपाठ 'गॅलरी रॅम्पार्ट'ने हरकृष्णलाल यांच्या गेल्या आठदहा वर्षातील चित्रांचे प्रदर्शन भरविले होते. जून महिन्यात हरकृष्णलाल यांच्या चित्रांचे एक प्रदर्शन पॅरिस येथे भरणार आहे. त्यांच्या घरी जाऊन ती चित्रे पाहण्याची संधी मला लाभली; या चित्रांपैकी फक्त चारपांचच त्यांच्या सिंहावलोकनात्मक प्रदर्शनात मांडण्यात आलेली होती. त्यामुळे त्यांच्या शैलीत गेल्या दहा वर्षांत घडलेल्या सूक्ष्म स्थित्यंतरांचा मला जास्त मार्मिकपणे पडताळा घेता आला.

पूर्वीच्या काळी त्यानी रंगविलेली काही निसर्गचित्रे 'गॅलरी रॅम्पार्ट'मधील प्रदर्शनात होती. यात गोव्यामधील आणि केरळातील दृश्ये होती. प्रत्यक्ष जागी चित्रण करण्याऐवजी त्या त्या स्थळाच्या अवलोकनाने मनात साठलेल्या आठवणींच्या अनुषंगाने आपल्या स्टुडिओतच हरकृष्णलाल यांनी ही चित्रे रंगविलेली आहेत. त्यांच्या शैलीच्या पाठी रूढ सौंदर्यवादी दृष्टिकोण नाही; त्यांची रंगयोजना आणि कुंचल्याचा वापर दोन्ही रांगडी आहेत.

यानंतरच्या काळात त्यानी रंगविलेली दृश्ये, विषय आणि शैली या दोन्ही बाबतीत जास्त मुक्त आहेत. भडक रंग ते 'इम्पॅस्टो' पद्धतीने, म्हणजे कुंचल्याच्या जाडजूड लेपांनिशी, चित्रफलकावर








उतरवितात. आणि या रंगांच्या झंझावाती आवर्तनांतूनच स्फोटक असा दृश्य परिणाम साधला जातो. ही चित्रे 'अॅबस्ट्रॅक्ट' पद्धतीला फार जवळची आहेत.

पॅरिसच्या प्रदर्शनासाठी हरकृष्णलाल यांनी जी चित्रे रंगविली आहेत ती त्यांच्या पूर्वीच्या कोणत्याही चित्रांपेक्षा वेगळी आहेत. या चित्रांचा विषय म्हणजे स्त्री आणि निसर्ग या दोहोंच्या प्रकृतीच्या केंद्रस्थानी असलेली निर्मितीक्षमता आणि जननतत्त्व. निसर्गामध्ये या तत्त्वाचा आविष्कार फळाफुलांद्वारे होतो, आणि फळाफुलांची ही निसर्गसिद्ध भूमिका प्रेक्षकाच्या मनात ठसेल अशा प्रकारेच हरकृष्णलाल यांनी ती चित्रफलकावर उतरविलेली आहेत.

स्त्रीच्या नग्नदेहाचे चित्रण त्यांनी सांकेतिक ठसठशीतपणाने न करता, स्त्रीदेह हा जणु निसर्गाच्या कोपात उमललेले एखादे धवल पुष्प असावे अशा पद्धतीने केलेले आहे. या स्त्रियांचे चेहरे-मोहरे स्पष्टपणे रेखाटलेले नाहीत, आणि त्यांच्या देहाच्या कमनीय रेषा उत्तान न वाटता भोवतालच्या पर्णराजीशी एकजीव होतील अशाच प्रकारे रंगविलेल्या आहेत.

हरकृष्णलाल यानी या चित्रात वापरलेले रंग भडक असले तरी त्यांच्या संयोजनात अर्थपूर्णता आहे. फ्रेंच चित्रकार गोगँ याने ताहिटी बेटावर काढलेल्या चित्रातील रंग, त्याचप्रमाणे सेझानच्या निसर्ग-चित्रातील रंग यांची आठवण करून देणारे हे रंग आहेत. आणि तरीही कोणत्याही दृष्टीने ही चित्रे पूर्वसूरींची आंधळेपणे नक्कल करीत नाहीत.

मे महिन्यात दुसऱ्या एका नामवंत चित्रकाराच्या रेखाचित्रांचे प्रदर्शन पाहायला मिळाले. जॉर्ज केट या साठीच्या उंबरठ्यावरील सिलोनी चित्रकाराचे नाव रसिकांना परिचित आहे. मात्र १९४७-नंतर त्यांच्या चित्रांचे प्रदर्शन मुंबईत भरलेले नाही. 'गीतगोविंदा'चा त्यानी जो इंग्रजी अनुवाद केलेला आहे त्याच्या प्रकाशित आवृत्तीत आपल्याला त्यांची रेखाचित्रे दिसतात. कॅन्डीच्या परिसरात ते गेली कित्येक वर्षे वानप्रस्थाश्रमात राहत आहेत. (त्यांच्या भेटीचा उल्लेख प्रभाकर पाध्यांच्या एका प्रवासलेखात वाचकांना सापडेल.)

'गॅलरी केमोल्ड'ने भरविलेल्या त्यांच्या रेखाचित्रांच्या प्रदर्शनात स्त्रीदेहाचे सौंदर्य मोजक्या, ठसठशीत रेषांत साकार केलेले होते. अजंठा येथील भित्तिचित्रातल्या अगर प्राचीन भारतीय शिल्पातल्या स्त्रियांप्रमाणे केट यांच्या चित्रातील स्त्रियासुद्धा 'स्तनाकार जगत्' या विंदा करंदीकरांच्या ऋचेतील पहिल्या ओळीची आठवण करून देतात. विशालस्तनी आणि पृथुलनितंबिनी अशा या स्त्रीदेहाच्या प्रतिमा मनात विकार निर्माण करीत नाहीत याचे एक कारण त्यांच्या डोळ्यांतील भाव अतिशय सात्विक असतो.

या देहसौंदर्याबाबत केट यांचा दृष्टिकोण खजुराहोच्या शिल्पकारांच्या आसक्तीशी जुळता आहे. एकदोन चित्रात एक स्त्री आपल्या जवळच्या स्त्रीचा स्तन कुरवाळण्याच्या पवित्र्यात दिसते. दुसऱ्या एका चित्रात एक पुरुष तितक्याच मोकळेपणे आपल्या प्रेयसीच्या वक्षःस्थळाला स्पर्श करीत आहे. केट यांच्या विशिष्ट चित्रणशैलीमुळे अश्लीलता या चित्रात डोकावण्याचा प्रश्नच उरत नाही.

अलीकडे जॉर्ज केट हे दक्षिण भारताचा प्रवास करून आले. तेथील प्राचीन मंदिरातून पाहिलेली नर्तकींची शिल्पे त्यांनी आपल्या वयाचशा चित्रांद्वारे प्रेक्षकांच्या डोळ्यांपुढे ठेवण्याचा प्रयत्न केलेला आहे. भरतनाट्यम् पद्धतीचे नृत्य करणाऱ्या या अप्सरांच्या रेखाकृती काही प्रमाणात पुनरुक्तीचा दोष टाळू शकलेल्या नाहीत.

एका चित्रात विष्णूने ऊर्वशीचे चित्र रंगवून तिला निर्माण केले हा पुराणातील प्रसंग रेखाटलेला आहे. विष्णूच्या हातातील कुंचल्याचे टोक चित्रातील ऊर्वशीच्या स्तनाग्रावर हळुवारपणे टकवलेले आहे. जॉर्ज केट यांच्या चिरनूतन चित्रकलेचा हा एक सर्वांगसुंदर आविष्कार होय.

## हिंदी साहित्यविश्वात खळबळ माजविणारे नाटक

मोहन राकेश यांचे 'आधे अधूरे' हे हिंदी नाटक थिएटर युनिटने अलीकडेच रंगमंचावर आणलेले आहे. ते पाहत असताना विजय तेंडुलकरांच्या एखाद्या नाटकाची (उदा. 'मधल्या भिंती', 'मी जिंकलो, मी हरलो') आठवण होणे अपरिहार्य होते. (तेंडुलकरच या नाटकाचा मराठी अनुवाद करीत असल्याची बातमी आहे.)

हिंदी साहित्यविश्वात मात्र या नाटकाने खळबळ उडविलेली आहे. "डोळ्याला झापडे न बांधता आजच्या एका नाटककाराने प्रथमच भोवतालच्या परिस्थितीचे मर्मभेदक चित्रण केलेले आहे" असे टीकाकारांनी त्याबाबत म्हटलेले आहे.

आजच्या भारतातील एका मध्यमवर्गीय कुटुंबाची ही कहाणी आहे. आई नोकरी करून साऱ्या कुटुंबाचा चरितार्थ चालविते; बाप काहीच करीत नाही, आणि आपल्या बायकोच्या लेखी कवडीमोल आहे; मोठी मुलगी आईच्याच एका प्रियकराचा हात धरून पळून गेलेली आणि विवाहानंतर भ्रमनिरास झालेली; मुलगा ना अभ्यास ना नोकरी अशा स्थितीत त्रिशंकूसारखा लोंबकळत बंडखोरीचा आव आणणारा आणि धाकटी शाळेत जाणारी मुलगी कोणाच्याच काबूत न राहणारी.

नाटकाच्या सुरुवातीला सूत्रधाराची भूमिका पत्करलेला बाप प्रेक्षकांना सांगतो की ही तुमची–आमची सर्वांची कहाणी आहे. मोठी मुलगी हताश होऊन माहेरी परत आलेली असते. आई आणि बाप यांच्यातील बेबनाव इतक्या पराकोटीला जातो की बाप घर सोडून चालता होतो आणि आपल्या एका मित्राच्या आसऱ्याला जाऊन राहतो.

नंतर आपल्याला नोकरीच्या आणि संसाराच्या दुहेरी ओझ्यामुळे सतत चिडीला आलेल्या आईच्या कचेरीतील तिचा 'बॉस' चहासाठी घरी आलेला दिसतो. त्याच्या ओळखीने आपल्या मुलाला कोठेतरी चिकटवावे असा आईचा भाबडा हेतू असतो. परंतु हा 'बॉस' आपल्या मठ्ठपणाचे आणि निरुत्साहाचेच प्रदर्शन करीत

राहतो. मुलाला आईचा मिंधेपणा रुचत नाही. या 'बॉस'च्या द्वारे राकेश यानी वरिष्ठ अधिकारी वर्गाचा फारच खोचकपणे उपहास केलेला आहे. त्यामुळे नाटकाच्या वातावरणातील ताण किंचित् कमी होतो.

यानंतर येतो आईचा एक मित्र. नवऱ्याच्या व्यक्तिमत्त्वात तिला ज्या त्रुटी सापडतात त्यांची भरपाई करण्यासाठी ती फार पूर्वीपासून एकेका पुरुषाच्या नादी लागत आलेली असते. परंतु तिला पूर्णपणे समाधान देणारा आणि नवऱ्याची जागा घेऊ शकणारा असा पुरुष तिच्या आयुष्यात येतच नाही.

अखेर येतो नवऱ्याचा मित्र. आणि त्याच्या व आईच्या संभाषणातून स्फोटकपणे तिच्या अपयशी संसाराचे रहस्य आपल्यापुढे मांडले जाते. नाटकाच्या अखेरीला या कुटुंबाच्या भीषण शोकात्मिकेचे पुरते शवच्छेदन झालेले असते. आणि तरीही ही शोकात्मिका राकेश यांनी अनिर्णितच ठेवलेली आहे, याचे कारण प्रत्यक्ष जीवनातही तिचा ठामपणे असा शेवट होतच नाही. शेवट कोणता मानायचा हे त्यांनी प्रेक्षकांवरच सोपवलेले आहे.

सत्यदेव दुबे यांनी दिग्दर्शित केलेला 'आधे अधूरे'चा प्रयोग अथपासून इतिपर्यंत मनाची पकड घेणारा होता. याचे मुख्य कारण म्हणजे अत्यंत समर्पक भूमिकायोजना.

आई (ज्योत्स्ना कार्येकर), बाप (अमरीश पुरी), मोठी मुलगी (दीपा वसरूर), मुलगा (अमोल पालेकर) आणि धाकटी मुलगी (भक्तिलता बर्वे) या सर्वांनी आपली कामे समजूनउमजून केली. आईच्या बॉसची, मित्राची आणि बापाच्या मित्राची अशा इतर तीन पुरुषांच्या भूमिका अमरीश पुरी यांना देण्यात एक प्रकारचे औचित्य होते, कारण तिच्या जीवनात तिने पत्करलेल्या जोडीदाराचे ते तीन पर्याय असतात.

त्यातही सर्वात संस्मरणीय अभिनय वाटला तो दीपा वसरूर यांचा. नवनवे नट आणि नटी प्रभावीपणे रंगमंचावर आणण्याबाबत दुबे यांची ख्याती आहे. कुमारी वसरूर या त्याला अपवाद नाहीत. त्यांचा मुद्राभिनय आणि त्यांचे संवादोच्चार या दोहोंतही एक विलक्षण तीव्रता होती. मराठी रंगमंचावरसुद्धा इतका प्रत्ययकारी व समर्थ अभिनय क्वचितच पाहायला मिळतो. शोकात्मिकेशी आणि शोकात्म अभिनयाशी तर मराठी रंगभूमी आपली ओळख विसरल्यासारख वाटते आहे. ● ● ●

---

( पृष्ठ ५१ वरून–पंचांगुळ्या )

बोटांभोवती क्षणभर घट्ट आवळली गेली होती आणि मग परत ढिली पडली होती. त्या एका लहानशाच हालचालीत त्याच्यासाठी खास असा एक संकेत होता. तो तर त्याला मुळीच आवडला नाही. आवासाहेब वाट पहात होते.

"काही दिसत नाही हो आवासाहेब–" तो आवंढा गिळत म्हणाला. त्यांच्यासारख्या एका सज्जन गृहस्थाची अशी फसवणूक करणं त्याच्या अगदी जिवावर आलं होतं–पण तो तरी काय करणार ? त्यांना सांगून त्यांचा मनस्तापच वाढवायचा की नाही ? कारण आधीच त्यांना शंका आली होती. हा हाताचा जडपणा केवळ मानसिक संवेदना असेल किंवा–किंवा त्या हातात घरोखरच काही वेगळं होतं का ?

आवासाहेबांनी दोन्ही हात छातीवर ठेवले व ते एक मोठा सुस्कारा सोडून म्हणाले, "काही दिसत नाही ना ? मला वाटलंच होतं तसं मी सारखा डाव्या हाताने चाचपून पहातच असतो जाऊ द्या झालं . . . असा निष्क्रीयपणा आला की मनाला नाही नाही ते चाळे सुचतात . . . . ही डोळ्यासमोरची चित्रं त्यातलाच एक भाग असली पाहिजेत. . . ." चंद्रू त्यांचा निरोप घेण्याच्या क्षणाची वाट पहात होता, पण त्यांना अर्थात हे दिसणं शक्यच नव्हतं; ते स्वतःच्याच कोणत्या तरी विचारात गर्क झाले होते " आजवर रात्रीची मला कधी भीती वाटलेली नाही, चंद्रू पण आताशी आताशी जरा अस्वस्थ वाटतं खरं आसपास काहीतरी हालचाली चालल्यासारख्या वाटतात या अंधारापुढे काही चालत नाही बघ जरा जाग आली की सारं चुपचाप होतं मागचा सारा वेडरपणा गेला बाबा ! त्यावेळी कोणाच्याच इशाऱ्यांना मी भीक घातली नाही. ते नको नको म्हणत असलेल्या जागी गेलो, नाही नाही ती पुस्तकं वाचली . आजवर कोणाला कल्पनाही नव्हती अशी गुपितं मला समजली त्यातली सर्वच उघड करून सांगण्यासारखी नाहीत त्यांच्यावर कोणाचा विश्वासच बसणार नाही. . पण काही काही वेळा भीती वाटते लोकांच्या इशाऱ्यात खरोखरच काही अर्थ होता का ? माझ्या हातून निषिद्ध असं खरोखरच काही झालं का ? हा माझा पाठपुरावा म्हणजे त्या हस्तक्षेपाचा तर परिणाम नाही ?"

"आवासाहेब, मोकळे मोकळे असता म्हणून तुम्हाला हे असले विचार सुचतात . तुमचं ते ब्रेलचं लेखनवाचन सुरू झालं की मग मनाला काही तरी उद्योग मिळेल नि हे सगळं विसराल . ."

"असेल, असेल, तसंही असेल–" आवासाहेब म्हणाले, पण त्यांचा विश्वास बसलेला दिसत नव्हता; आणि त्याचा स्वतःचा तरी आपल्या शब्दांवर कोठे विश्वास होता ? आवासाहेबांच्या शब्दांनी त्याच्या मनात विचारांची एक नवीच साखळी तयार झाली होती. काल पाहिलेल्या प्रकाराला काही स्पष्टीकरणच नाही या सबबीवर तो स्वतःचं समाधान करू पहात होता. आणि आता त्याला मागे काहीतरी कारण दिसायला लागलं होतं . तेव्हा तीही आशा दुरावली होती. एक गोष्ट उघड होती आबासाहेबांनी शरीरात जोर होता आणि मन खंबीर होतं तेव्हा नाही नाही त्या जागी जाऊन नाही नाही ते धोके पत्करले होते; आणि त्यांच्या हस्तक्षेपामुळे (!) संतप्त झालेल्या काही शक्ती बदला घेण्यासाठी दबा धरून बसल्या होत्या. आवासाहेबांची जीवनशक्ती क्षीण होताच या टपून बसलेल्या शक्तींनी उचल घेतली होती .त्याचाच हा परिणाम होता ! तेव्हा त्यांचे आश्वासनाचे शब्द त्याला स्वतःलाच फुसके वाटणारच !

**[ उत्तरार्ध पुढील अंकी ]**





# उद्योगसिंह लक्ष्मणराव किर्लोस्कर



आपल्या कर्तृत्वाने उभा देश भारून टाकणारे आणि 'महाराष्ट्राचे हेन्री फोर्ड' या नावाला पात्र झालेले कै. लक्ष्मण काशिनाथ किर्लोस्कर यांची जन्मशताब्दी गेल्या दि. २० जूनला साजरी झाली.

शाळेत असल्यापासून हा चित्रकलेचा नादी विद्यार्थी शालेय शिक्षण सोडून चित्रकलेच्या उच्च शिक्षणासाठी मुंबईला धावला, पण त्याच सुमाराला ब्रिटनमधून हिंदुस्थानात प्रथमच आलेल्या सायकलींनी त्याचे लक्ष वेधून घेतले आणि आपला न्याय्य हक्क डावलल्यामुळे व्हिक्टोरिया ज्युबिली टेक्निकल इन्स्टिट्यूटमधील नोकरीचा राजीनामा देऊन वेळगांवला हा तरुण परतला तो यंत्रांचे वेड घेऊनच. बेळगावला वडील बंधू श्री. रामूअण्णा किर्लोस्कर यांच्याकडे आल्यावर त्यांनी तेथे सायकलींची दुरुस्ती करण्याचे दुकान थाटले आणि निरनिराळ्या यंत्रांबाबत प्रयोग सुरू केले. त्यांनी पहिले यंत्र तयार केले ते कडवा कापण्याचे आणि तेव्हापासून त्यांचे शेतकऱ्यांच्या औजारांकडे लक्ष वेधले. त्यावेळी शेतकरीवर्ग लाकडी नांगर वापरीत असे. त्याऐवजी वजनाने हलका पण कामाला दणकट असा लोखंडी नांगर लक्ष्मणरावांनी तयार केला. तेव्हापासून किर्लोस्कर म्हणजे नांगर असे समीकरणच होऊन बसले. लक्ष्मणरावांचे इतर यंत्रसामुग्री तयार करण्याचे प्रयत्न चालू असतानाच बेळगांवची त्यांच्या कारखान्याची जागा त्यांना खाली करावी लागली; तेव्हा ते औंध संस्थानात गेले. त्यावेळचे औंध संस्थानचे अधिपती श्रीमंत बाळासाहेब पंतप्रतिनिधी हे पुरोगामी विचारांचे संस्थानिक होते. त्यांनी कुंडल रेल्वे स्टेशनजवळचा उघडा पडीत माळ किर्लोस्करांच्या यंत्र-उद्योगासाठी देऊ केला. लक्ष्मणरावांनी त्या माळरानावरच आपला कारखाना उभारण्याचा निश्चय केला आणि मोठ्या जिद्दीने तो अमलातही आणला. कारखान्यावरोबरच कारखान्यात काम करणाऱ्या कामगारांसाठी घरेही बांधली. आणि अशा रीतीने महाराष्ट्रातील पहिली औद्योगिक वसाहत तेथे उभी राहिली.

किर्लोस्करांच्या या कारखान्याचा व्याप सारखा वाढतच राहिला. त्यामुळे तथील जागाही अपुरी पडू लागली तेव्हा लक्ष्मणरावांनी म्हैसूर संस्थानात हरिहर येथे मशीन टूल्सचा कारखाना काढला. नंतर पुणे, बंगलोर येथेही किर्लोस्करांचे कारखाने निघाले आणि आज किर्लोस्कर समूहाचे एकंदर अकरा कारखाने असून त्यापैकी एक परदेशात म्हणजे फ्रँकफुर्ट (जर्मनी) येथे आहे. सर्व कारखाने मिळून पन्नास कोटींवर भांडवल गुंतलेले असून तीस हजारांवर कामगार कामावर आहेत. येथे लक्ष्मणरावांच्या भाग्याचा उल्लेख केला पाहिजे. कारखान्यांच्या वाढीवरोबरच त्यांच्या कार्यक्षमतेकडेही सतत लक्ष पुरविण्याची आवश्यकता असते. ते काम त्यांचे चिरंजीव श्री. शंतनुराव यांनी अंगावर घेतले आणि वडिलांइतक्या धडाडीने ते पार पाडले आणि आजही ते पार पाडीत आहेत. किर्लोस्कर पंप आणि किर्लोस्कर एंजिने ही किर्लोस्कर कारखान्यांची खास उत्पादने परदेशीही लोकप्रिय झाली पाहिजत अशी महत्त्वाकांक्षा त्यांनी धरली आणि त्यासाठी अनेकवेळा परदेशच्या वाऱ्याही केल्या. त्यांच्या चिकाटीच्या प्रयत्नांचे फळ म्हणूनच आता किर्लोस्कर कारखान्यातील उत्पादित यंत्र परदेशात निर्यात होत असतात




आणि त्यांनी कार्यक्षमतेबाबत नावलौकिकही मिळविला आहे. अशा रीतीने श्री. शंतनूरावांनी आपल्या वडिलांच्या कीर्तीत त्यांना साजेशी भरच घातली आहे.

लक्ष्मणरावांनी मोठमोठे कारखाने उभारले आणि त्यातून यंत्रोत्पादन होऊ लागले; पण केवळ कारखान्यांकडेच लक्ष पुरवून ते थांबले नाहीत. कारखान्यात काम करणारा कामगार सुखी असेल; त्याला विवंचना नसतील तरच त्याच्याकडून अधिक आणि चांगले उत्पादन होऊ शकते हे त्यांनी बरोबर ओळखले होते आणि त्यादृष्टीने किर्लोस्करवाडीची वसाहत आदर्श करण्यासाठी ते सतत प्रयत्नशील राहिले. त्यासाठी त्यांनी कामगारांच्या सामाजिक उन्नतीकडेही लक्ष पुरविले आणि कामगारांना श्रमदानाला प्रवृत्त करून भव्य समाजमंदिराची उभारणी केली. किर्लोस्करवाडीतील सामाजिक कार्यक्रम नेहेमीच नावीन्यपूर्ण आणि कलात्मक असत; कारण त्यामागे लक्ष्मणरावांची प्रेरक शक्ती असे.

किर्लोस्करांच्या मालाची जाहिरात करण्याच्या हेतूने 'किर्लोस्कर खबर'चा जन्म झाला आणि त्याचेच रूपांतर पुढे 'किर्लोस्कर' मासिकात झाले. या कामाकडे लक्ष्मणरावांनी आपले पुतणे श्री. शंकर-






राव किर्लोस्कर यांची योजना केली; ती अत्यंत यशस्वी ठरली. 'किर्लोस्कर' मासिकाला पुढे 'स्त्री'ची जोड लाभली आणि नंतर 'मनोहर'चाही जन्म झाला. या सर्व पसाऱ्यामागील मूळ आधार म्हणजे लक्ष्मणरावच होते. लक्ष्मणरावांनी औंध संस्थानच्या कारभारातही लक्ष घातले आणि तेथील लोकाभिमुख संस्थानिकाच्या लोकशाहीवरील प्रेमाचा फायदा घेऊन गरीबांच्या कल्याणाच्या दृष्टीने वेधक कामगिरी बजावली.

अशा या 'घिसाडघाचा कारखानदार' झालेल्या महाराष्ट्राच्या महापुरुषाच्या चिरंतन स्मृतीला त्यांच्या जन्मशताब्दीनिमित्त अभिवादन !

# राजकारणी संत बादशहाखान



स्वातंत्र्यपूर्व कालातील एक भारतीय लोकनेते, स्वातंत्र्य चळवळीतील झुंजार सेनानी, म. गांधींचे एकनिष्ठ अनुयायी, सीमा प्रांतातील पठाणांना स्वातंत्र्य लढ्याची प्रेरणा देणारे पुढारी खान अबदुल गफारखान ह्यांना यंदाचे पं. नेहरू पारितोषिक देऊन त्यांच्या भारत सेवेचा व शांति पुरस्काराचा व महान त्यागाचा जणु गौरवच समितीने केला आहे. भारतात अलिकडे प्रत्येक लहानसहान बाबतीत सार्वमत, जनमत कौलाची भाषा वापरली जाते. परंतु हजारो वर्षाच्या भारताच्या इतिहासाला व भूगोलाला छेद देणारी व असंख्यांना वित्त, घरदार, क्वचित धर्म व दारेलाही मुकायला लावणारी भारताची फाळणी जेव्हा घाईघाईने स्वीकारली गेली तेव्हा मात्र हे दोन मौलिक शब्द कुणाला सुचले नाहीत. त्यामुळे स्वातंत्र्य चळवळीत कधीही 'लीगी' नसलेला वायव्य सरहद्दप्रांत केवळ मुस्लिम बहुसंख्येचा प्रांत म्हणून पाकिस्तानात गेला. आणि देशभक्त बादशहाखान 'बंदी' झाले. त्यांची भारतीय (व बावनकशी) देशभक्ती एकाकी पडली व 'वनवासी' झाली. हा वनवास हे आमचे कर्तृत्व व त्यांचे (अर्थातच) प्राक्तन ! परंतु खानसाहेब व गफारखान ह्या दोघाही भावांच्या वाट्याला सतत उपेक्षा, वनवास व बंदिवास आला. तरीही ते सारे त्यांनी शांतपणे सोसले. मनात कसलीही कटुता येऊ दिली नाही. गांधींच्या सहवासात ह्या पठाणाचे हृदय एखाद्या संतासारखे झाले आणि त्यांची ही संतवृत्ती आजही कायम आहे. 'पख्तून'ची चळवळ चालू असली तरीही बादशहाखानांची 'सम' वृत्ती कायम आहे. हालअपेष्टात आम्ही त्यांना (निवड न विचारता) लोटून दिले तरीही भारत, भारतीय ∴ते, भारतीय तत्वज्ञान, भारताची प्रगति ह्या विषयीची त्यांची आस्था अजून कायम आहे. त्यांचेच उद्‌गार द्यायचे झाले तर असे म्हणता येईल की "जब तक महात्माजी थे; हम को पूरा इत्मीनान था कि मुल्क के टुकडे नहीं होंगे । लेकिन महात्माजी भी कुछ कर नहीं सके । अंग्रेज की चाल कामयाब हो गयी और हमें भेडियों के आगे फेंक दिया गया ।"

गांधी-नेहरू, पटेल यांच्या बरोबरीने आपण स्वातंत्र्य संग्रामात भाग घेतला पण आपल्याला अर्धवट अवस्थेत सोडून देण्यात आले आहे याची खंत त्यांनी अनेकवार व्यक्त केली आहे. अनेक ठिकाणी व्यक्त केली आहे. पठाणांच्या चळवळीला भारताने नैतिक व प्रत्यक्षाप्रत्यक्ष पाठिंबा द्यावा असेही अनेकांना वाटते. आज बादशहाखान काबूलमध्ये आहेत–पाकिस्तानमधील जनतेत त्यांच्याविषयी आस्था नाही. कारणे दोन-लीगविरोधी भूमिका घेऊन ते काँग्रेसबरोबर होते व आता पख्तून चळवळ करतात. हिंदूंचे दलाल म्हणूनही त्यांच्यावर आरोप केले जातात. 'भारतद्वेश' हा पाकचा आत्मा आहे. बादशहाखानांनी भारतमैत्री सोडली नाही. धार्मिक स्वतंत्रता ते मानतात. संत वृत्तीनेच ते 'मानवी' समानता पाहतात, मानतात. डॉ. खानसाहेब (भाऊ) गेले. पाक सुटले. अफगाणिस्तानमध्ये वास्तव्य आहे. भारतात स्थान नाही. "भारत-पाक संघर्ष घडला की तुम्हाला पख्तूनांची आठवण येते" अशा कटु शब्दात ते भारतीय वृत्तीचा निषेध करतात. 'तुम्ही मतलबी आहात' त्या शब्दात त्यांची 'एकाकी' वेदना बोलू लागते. "गांधींच्या वचनांची तुम्हाला विस्मृति झाली आहे" असंही ते म्हणतात.

"अफगाणिस्तानला पाकची जमीन नको. बंदर नको. अफगणिस्तान आमच्या पाठीशी आहे, कारण आमचे रक्ताचे नाते आहे" असे सांगून व आपल्याला सर्व सुखे लाभत असूनही आपण अशांत आहोत कारण आपल्याला आपल्या भूभागाची व जनतेची सेवा करता येत नाही हा सेवाभाव हा बादशहाखान यांचा स्वभाव आहे. धर्म आहे. वृद्धत्वानेही हा धर्म त्यांच्या हृदयात घर करून आहे; तो त्यांना अशांत ठेवू शकतो यातच त्यांच्या क्रियाशील व्यक्तित्वाचा प्रत्यय येतो. कटुता राहणारच. कारण फाळणीची वेदना त्यांनी जास्त अनुभवली आहे... वनवास अनुभवून आता नेहरू पारितोषिक घेण्याच्या निमित्ताने का होईना हा वयोवृद्ध, त्यागी, संत वृत्तीचा, क्रियाशील नेता भारतात येत आहे. त्यांच्या बरोबरची 'पाने' (बरोबरी) गळून गेली आहेत. अशा भारतात हा सर्व अर्थानी उंच लोकनेता येत आहे. आम्ही त्याच्या भेटीच्या निर्णयाचे स्वागत करतो.

—आदित्य

## ाणे एक–बाजू दोन

राष्ट्रीय सुरक्षा निधीसाठी "दागिने द्या, ैसे द्या, सर्वस्व द्या" अशी मागणी केली ात होती. नेहरूजींच्या स्वप्नाला तडा ेला होता. कॉ. डांगे यांचा विश्वास खोटा रला होता (समाजवादी राष्ट्र आक्रमण रीत नाही) 'भाईभाई'च्या घोषणा हमालयाच्या हवेत विरल्या होत्या आणि ेपावत चिनी सैन्य पुढे सरकत होते. ातम्या येत होत्या. सेला पडले. बोमदिला ावूने सर केले. माणसे अस्वस्थ होत होती. ाष्ट्रीय संरक्षणा'साठी सर्वस्व देण्याचे आवा- न केले जात होते. १ नोव्हेंबर १९६२ ह्या दवशी पंडित नेहरूंच्या घरी रिझर्व बँकेच्या धिकाऱ्यांनी एक केंद्र उघडले. तेथे स्त्रयांनी आपापले अलंकार-भूषणे आणून ण्याची व्यवस्था करण्यात आली होती. ाणसे धावत होती. आपापल्या जवळचे ास्तीत जास्त देशाला देईन ही अहमह- मका त्यांच्यात होती. एक दिवस वर्तमान- त्रांच्या प्रतिनिधींना कानमंत्र दिला जातो. ाज पंतप्रधान कन्या इंदिराजी आपले र्व दागिने राष्ट्रीय निधीसाठी देणार ाहेत. वार्ताहर जमतात, छायाचित्रकार ॅमेरे सरसावून उभे राहतात. त्यांची सोय हावी म्हणून इंदिराजी आपले हात पुढे रतात. बँकेचा शीख अधिकारी त्यांच्या ातातल्या बांगड्या काढून घेतो. कॅमेरे काम' करतात. प्रसंग मोठा हृद्य असतो. ाणसांची मने हेलावून जातात. काहींचे ोळे पाणावतातही. दुसऱ्या दिवशी 'स्टेटस्- न'च्या दिल्ली आवृत्तीत इंदिराजींचा ीन कॉलमी फोटो प्रसिद्ध होतो. त्या फोटो- ाली लिहिलेले असते "इंदिरा गांधी ानी आपल्या जवळचे सर्व दागिने व डजवाहिर राष्ट्रीय संरक्षण निधीसाठी झर्व बँक अधिकाऱ्यांच्या स्वाधीन केले." ातले काही दागिने तर त्या लहानपणी ापरत असत. इंदिराजींनी जवळचे सर्व ाने दिले अशी बॅनर लाइन त्या वार्तेच्या ारोभागी असते. वजन ३३६ ग्रॅम अस- ाचेही नोंदविले गेलेले असते.

चिनी आक्रमणापूर्वी दोनच महिने डितजी लोकसभेत म्हणाले होते "चीन भारतावर आक्रमण करील असे म्हणणे मूर्खपणाचे आहे". आक्रमण झाल्यावर दाटून आलेल्या कंठाने त्यांनी कबुली दिली की, "मी स्वप्नाळू जगात वावरत होतो." त्याची किंमत पडलीच होती. पडणारच होती. इंदिराजी त्यातलाच आपला वाटा उचलीत होत्या. नेहरु कुटुंबावर भारताचे प्रेम होते. जनता म्हणाली "पंडितजी की जय ! इंदिराजी की जय।"

नाण्याची ही एक बाजू झाली.

मध्यंतरी काळ लोटला. पंडितजी गेले. शास्त्रीजीही गेले. आणि खुद्द इंदिराजीच पंतप्रधान झाल्या. लोकसभेत त्यांच्या 'संपत्ती'विषयींच्या प्रश्नोत्तरात मोरारजी- भाईना एक कबुली द्यावी लागली पंतप्रधा- नांच्या संपत्ती विषयक आकड्यात २०,८०१ रुपयांची भर घालण्यात आली व इन्स्पेक्टर्सनी ती घालायला लावली अशी कबुली अर्थमंत्र्यांनी कन्वरलाल गुप्ता यांना दिली. आणि इथेच नाण्याची दुसरी बाजू उघडी पडली.

ही भर कां पडली ? इन्स्पेक्टर्सना काय आढळले ? तर १९६२ नंतरच्या काळात (दोन वर्षात) इंदिराजींनी २०८०१ रुपये किंमतीचे नवे दागिने व जडजवाहिर खरेदी केलेले होते. परंतु संपत्ती कराच्या कागद- पत्रात ते दाखविण्यात आलेले नव्हते. ते इन्स्पेक्टर्सनी दाखवले व त्या कागदपत्रात दाखल करून घेतले. एक वर्षभर मोरारजींनी आपल्या पंतप्रधानांचे संरक्षण करण्याचा प्रयत्न केला. शेवटी उत्तर देताना ते हलक्या आवाजात म्हणाले १९६५।६६ च्या वर्षात त्या दागिन्यांच्या किंमतीबद्दलची सूट 'चुकून' क्लेम करण्यात आली होती. परंतु संपत्ती कर अधिकाऱ्यांनी सूट नाकारली".

नाण्याच्या ह्या दोन बाजू देऊन दिल्लीच्या 'ऑर्गनायझर'ने काही प्रश्न उपस्थित केले आहेत. ते प्रश्नही मूलभूत स्वरुपाचे आहेत. कायद्याचे अज्ञान असेल तर पंतप्रधानांना क्षमा नाही.

एक नोव्हेंबर १९६२ ला जर इंदिरा- जींनी सर्व दागिने दान म्हणून दिले तर अवघ्या दोन वर्षात त्यांच्याजवळ २०८०१



रुपयांचे दागिने कसे आले ? १९६५ पूर्वीच ते आले. त्यावेळी 'आणीबाणी' चालू होती. पाक युद्ध झाले. हजारो जवानांनी आपले देह धारातीर्थी ठेवले. देशाचे रक्षण प्रधान मानले. मग ह्याच कामात इतर स्त्रिया दागिने, द्रव्य काढून देत असता पंतप्रधानां- कडे मात्र दागिने वाढले, हे कसे ? त्यानी खुलासा केला पाहिजे.

## अरेरे ! ही तर पेट्रोलची टाकी

हिंदुस्थान देशाची गेल्या वीस वर्षातली जी वाटचाल (व घरंगळ) आहे ती पाहिली की कधी कधी मनात विचार येतो की शांति- ब्रह्म म्हणून ओळखल्या जाणाऱ्या (वा गेलेल्या) ह्या देशाची एक पेट्रोलची टाकी झाली आहे. पेट्रोल तुडुंब भरलेले आहे. म्हणजेच साऱ्या जीवनशक्ती रसरसून भर- लेल्या आहेत. कला आहेत. विद्या आहेत. शास्त्रे आहेत. इतिहास, परंपरा, संस्कृति, धर्म, तत्त्वज्ञान यांचे अधिष्ठान आहे. नगा- धिराज हिमालयापासून चरणप्रक्षालन कर- णाऱ्या सिंधुसागरापर्यंत ह्या देशात सारे काही आहे. येथे पराक्रम फुलला व आजही ही भूमी क्लीबांची वीण वाढविणारी झालेली नाही. कर्तृत्वाने हिमालय, परा- क्रमाचे मेरुमणी आजही ह्यात आहेत. आणि हे सारे असूनही हा देश मात्र एक पेट्रोलच्या टाकीसारखा झाला आहे. कोठ- ल्याही लहान मोठ्या चुकीने काडी फेकली जाते वा पडते. आणि त्याचा लगेच 'वणवा' होतो. तो जाळीत सुटतो. तो वणवा आप-पर पहात नाही. लहान-मोठा पहात नाही. न्याय-अन्याय पाहत नाही. जाळण्याचे त्याचे काम आणि भस्म ही त्याची मनः शांती. कधी तो मद्रासेत पेट घेतो. कधी म्हैसूरमध्ये; कधी तेलंगण तर कधी आंध्र-







आला होता. मघाशीच्या त्या माणसांचा रांगाही आता अदृश्य झाल्या होत्या. त्या दुष्ट चेटकीनें त्यांना पुन्हा एकांतवासात डांबले होते.

काही वेळाने ती चेटकी पुन्हा आली. तिने विचारले, "कसा गेला वेळ ?" कृष्णराव यावर काहीच बोलले नाहीत. ती म्हणाली, "अजूनही तू माझ्यावर रुष्ट दिसतोस. माझी गोष्ट तुला नाही का आवडली ? दुसरी एखादी गोष्ट सांगू ? की गाणे म्हणूनच तुझे मनोरंजन करू ? –नाहीतर थांब. मी तुला एक चलच्चित्र दाखवते. डोळे मीट. मी 'उघड' म्हणून सांगितल्याशिवाय उघडू नकोस." तिचे आज्ञापालन केल्याखेरीज कृष्णरावांना गत्यंतरच नव्हते. किंचित्कालाने तिने 'डोळे उघड' असे सांगितल्यावर त्यांनी डोळे उघडले. तो काय ! त्या कोठडीचे स्वरूप संपूर्णपणे पालटले होते. आता तेथे थोडा थोडा प्रकाश होता. त्या प्रकाशात कोठडीच्या भिंती दिसत होत्या. भिंतींवर चित्रे होती; आणि भिंतीच्या कडांना कपाटे लावून ठेवलेली दिसत होती. त्या कपाटांत काय होते हे मात्र कृष्णरावांस दिसले नाही.

'कपाटात काय ठेवले आहे ?' त्यांनी अज्ञपणे विचारले.

'ज़रा धीर धर. क्रमाक्रमाने तुला सर्व सांगितले जाईल.' असे म्हणून चेटकीने कृष्णरावांचा हात खेचला व ती त्यांना भिंतीकडे घेऊन जाऊ लागली. भिंतीशी पोचल्यावर ती म्हणाली, "हे माणसालय आहे. तुम्हा मर्त्य माणसांचे ग्रंथालय असते ना तसे. माझ्या मालकीच्या अशा असंख्य कोठड्या आहेत. त्यापैकी प्रत्येकीत असे माणसालय आहे. नीट ध्यान देऊन पाहा."

तिने एक एक कपाट उघडले व त्यातून एक माणूस चिमटीने बाहेर काढत ती म्हणाली, "हा १९३७ मधला माणूस. किती वर्षे असा धुळीत पडून आहे. त्याला वाळवी लागली आहे. त्याला तू आजवर निकालात कां काढले नाहीस ? या ठिकाणी ही मोठी फट कां दिसते आहे हे तुझ्या लक्षात आले का ?–येथे असलेली काही माणसे गहाळ झालेली आहेत . . . तू पडलास आळशी, कधी त्यांना शोधण्याचा प्रयत्न केलास का ?

—या ठिकाणी माणसांचा एक सटच तुला दिसेल. एका पार्टीच्या ठिकाणी तुला तो दिसला–आणि तेव्हापासून तो सटच तुला ठिकठिकाणी भेटतो. यातल्या सुट्या माणसांना काही अर्थच नाही. आणि ही पहा तू चोरलेली काही माणसे . . . ही खिळखिळी झालेली माणसे . . . ही मुखपृष्ठे गेलेली माणसे . . . . आणि ही मुखपृष्ठ घालून सजवलेली माणसे . . . . शिवाय हे काही गठ्ठे तसेच पडलेले आहेत. यातील माणसांचे तू अजून काहीही केले नाहीस. पहा कशी बुजबुजली आहेत, वरखाली झाली आहेत तुला हवे असलेले माणूस तुला चटकन मिळते तरी कसे रे ? आता असे कर. यातली तुला नको असलेली माणसे एका पिशवीत भर व माझ्याबरोबर चल. या अंधारकोठडीच्या एका कोपऱ्यात रद्दी माणसे विकत घेण्याचे एक दुकान आहे. चल." यावर कृष्णराव काहीच हालचाल करीनात. तेव्हा चेटकीनेच त्यातील काही माणसे पिशवीत कोंबली व ती दुसऱ्या कोपऱ्याकडे कृष्णरावांना घेऊन जाऊ लागली. तेथे बसलेल्या एका अदृश्य व्यक्तीला तिने विचारले, "ही माणसे विकत घेतोस का ?"

त्याने ती हाताळून पाहिली व तो म्हणाला, "मला यांचा काहीच उपयोग नाही. तू दुसरीकडे नेऊन पहा."

यावर ती चेटकी खदाखदा हसली व म्हणाली, "हेच मला या मूर्ख माणसाला सांगायचे आहे. ज्यांना रद्दीच्या दुकानातही काही किंमत नाही अशी माणसे याने जवळ बाळगली आहेत "

ती चेटकी हसतच राहिली. ते हास्य अधिकाधिक भेसूर होऊ लागले. त्या हसण्याचा वेग वाढल्यावर ती कोठडी हलू लागली. चेटकीचे हसणे चालूच होते. कोठडी आता हादरू लागली होती भिंती लटलट कापत होत्या. भिंतीच्या लगतची कपाटे थरथरत होती. चेटकी हसतच होती . . . . कृष्णरावांच्या जिवाचा थरकाप झाला होता. ते जमिनीवर निपचीत पडले होते. जरा वेळाने भिंती व कपाटे धडाधड खाली कोसळली. त्या कोसळण्याचा गगनभेदी आवाज झाला. कृष्णराव घाबरून वर उठणार इतक्यात त्या कपाटातली माणसे त्यांच्या अंगावर पडली. थरांवर थर साचत होते. माणसे वरून पडतच होती. कृष्णराव उठण्याचा प्रयत्न करत होते–पण त्याचा आता काही उपयोग नव्हता. ते त्या माणसांच्या खाली संपूर्णपणे गाडून गेले होते. त्यांना फक्त श्वासोच्छवास करता येत होता इतकेच.

–त्यांनी आता शेवटचा निकराचा प्रयत्न करण्याचे ठरवले. सर्व सामर्थ्य एकत्र करून ते उठू लागले–आणि काय आश्चर्य. असे उठण्याचा प्रयत्न करत असताना त्यांचा भार जमिनीवर एका जागी पडला व कोठडीत एकाएकी प्रकाश झाला ! –सूवर्णकांतीचा देदिप्यमान प्रकाश . . . त्या प्रकाशात त्यांना क्षणभर वरच्या भिंतींवरील अक्षरे दिसली . . . पायात वळवळणाऱ्या मृत आशा-आकांक्षा दिसल्या . . . येथून बाहेर पडण्याचे ते दारही दिसले . . . तो प्रकाश पाहून कृष्णरावांचे डोळे दिपून गेले

—इतक्यात माणसांचा आणखी एक थर कृष्णरावांच्या अंगावर कोसळला—आणि कोठडीत पुन्हा एकदा काळाकभिन्न अंधार झाला.

● ● ●

REGD. NO. MH-450 Licence No. 170 to post without pre-payment JULY 1969

DIPAVALI MONTHLY



Cover Printed At Asha Printery, Bombay-4.



अनुक्रमणिका